# माझे चार शब्द

"विविधवृत्त" साप्ताहिकानें मला मुख्यतः प्रसिद्धी दिली. "विविधवृत्ताचे" सपादक व प्रसिद्ध साहित्यिक श्री. चद्रकान्त विष्णु बावडेकर यानी अत्यत कळकळीने व आत्मीयतेनें मला सर्वतोपरी सक्रिय प्रोत्साहन दिलें. श्री. च. वि. बावडेकर याच्या या अलोट उपकाराची स्मृती माझ्या हृदयात नेहमीच ताजी राहील!

तसेच, प्रख्यात लेखक श्री. यशवत गोपाळ जोशी व सजीवनीचे सपादक याचे प्रथमपासूनच मला उत्तेजन मिळालेले आहे आणि याबद्दल त्याचा मी आजन्म ऋणी आहे.

मुखपृष्ठासाठीं सुदर चित्र जनार्दन सदाशिव लिमिटेड या छापखान्याचे व्यवस्थापक चित्रकार श्री. यशवतराव वझे यार्नी काढले आहे म्हणून त्याचेही आभार मानतो.

साहित्यसेवेच्या कामी मला वेळोवेळी उत्साहभरित करणाऱ्या अनेक-जणाची नावे मला इथे जरी घोषित करता आली नाहींत तरी माझ्या अतरगांत त्यांचे वास्तव्य केव्हाही आढळेल.

१ ऑगष्ट १९३८ ]

**विष्णु गणेश भिडे.**



परमपूज्य
तीर्थरूप दादांच्या
पवित्र चरणी
लीनभावानें

# कथाक्रम





# माझें आजपर्यंतचें प्रकाशन

| | | किमत | | | किंमत |
|---|---|---|---|---|---|
| १ | पुनर्भेट भाग २ रा | १-०-० | २१ | आईची कृपा | १-०-० |
| २ | वळवाचे पाऊस | १-४-० | २२ | व्यक्ति आणि वाङ्मय | १-४-० |
| ३ | दुर्दैवी मोहरे | १-०-० | २३ | साहित्य-सग्रह | ३-०-० |
| ४ | पैसाच पैसा | १-०-० | २४ | ललिता | १-८-० |
| ५ | फुलबाग | १-०-० | २५ | तटया भिल्ल | ०-१२-० |
| ६ | जीवनपथ | १-०-० | २६ | परशुराम चरित्र | १-४-० |
| ७ | आवडत्या गोष्टी | ३-०-० | २७ | हिदुस्थानची नवी राज्यघटना | १-०-० |
| ८ | चित्तरजन | १-४-० | २८ | हायस्कूल विद्यार्थी | ०-८-० |
| ९ | वायफळाचा मळा | २-८-० | २९ | उत्तरध्रुव | ०-४-० |
| १० | सोनेरी नागीण | १-०-० | ३० | सोशॅलिझम | १-०-० |
| ११ | वाहते वारे | ०-१२-० | ३१ | चुटके चमत्कार | ०-१२-० |
| १२ | रशियातील राज्यक्राति | २-८-० | ३२ | अलका | २-४-० |
| १३ | बाबू कुँवरसिह | ०-१२-० | ३३ | सावल्या | १-८-० |
| १४ | प्रो. शहाणे | ०-१२-० | ३४ | तिचें अखेरचें पत्र | १-०-० |
| १५ | गुलाबाच्या पाकळ्या | १-४-० | ३५ | चादणें | १-०-० |
| १६ | पुनर्भेट भाग ३ रा | १-४-० | ३६ | बलिदान | २-०-० |
| १७ | गारांचा वर्षाव | १-४-० | ३७ | होमकुड | २-०-० |
| १८ | रेशमी चिमटे | १-४-० | ३८ | पुनर्भेट भाग १ ला | १-४-० |
| १९ | उपहासिनी | १-८-० | ३९ | खेडयातील स्व. चित्रें | १-४-० |
| २० | शि. म. पराजपे चरित्र व आठवणी | १-०-० | ४० | नरम गरम | १-८-० |
| | | | ४१ | उर्मिला | २-०-० |

शिवाय सर्व तऱ्हेचीं पुस्तकें ऑर्डरीप्रमाणें पाठविलीं जातात .

प्रकाशकः— य. गो. जोशी, ६२३।१५ सदाशिव, पुणें २.

## कबुतर : : : १

'ए कान्ति, शेरभर बदामरोटी आण बघू!'

पोऱ्याला फौजदारसाहेबानीं ऑर्डर सुनावली व हॉटेलचे मालक शिवदासपत याजकडे वळून ते म्हणाले, 'माझ्या या शेषरावान आतांच जोर बैठका हाणल्या आहेत, काहीं खायला नको त्याला?'

'गोडी दिसती आहे व्यायामाची?' शिवदासपतानीं विचारलें.

इतक्यात कान्ति आला. त्याने फौजदारापुढें बदामरोटी ठेवली, ती शेषराजाकडे सारीत फौजदारसाहेब उद्गारले, 'अहो शिवदासपत, आपल्या या गावाला पुढच्या सालीं जो कुस्त्याचा फड होणार आहे, त्यात बक्षिस मिळवाव अशी मुलाला इच्छा आहे, होय ना रे?'

शेषरावानें मान डोलवीत शिवदासपताकडे पाहून म्हटले, 'यदा माझ्याच वडिलानीं पारितोषिक वाटलीं, पुढच्या वर्षी सगळ्यात मोठ मी उपटणार...'

हॉटेलचा पोऱ्या कांतिनाथ सारें सभाषण लक्षपूर्वक ऐकत होता. शेष-

रावाची व त्याची ओळख नव्हती असे नाहीं. चागला दाट परिचय होता, पण मुद्दाम गुर्मीनें शेषराजानें त्याच्याकडे दृष्टिक्षेपहि टाकला नाहीं.

फौजदारसाहेब शिवदासपताना म्हणत होते, ‘ चागली शिक्षणाची ऐपत असताना मराठी पुस्तकच झेपेनाशी झाली चिरजीवाला, कबुतर उडवण्याचा छद काहीं काळ होता, सध्या हा नाद घेतला आहेन्, बाकी वाईट नाही आपणा मराठी माणसाला हें ! ’

‘ हा. हा: ! मुलगा पहिलवान निघाला, तर हजार–पाचशेची इनामे कमवू लागेल ’

‘ छे· छे., तशावर विश्वास नाहीं माझा, चरितार्थाच मततच साधन हवच, काय रे काति ? ’ फौजदारसाहेब कातिनाथाकडे नजर फेकीत म्हणाले, ‘ तुझा व शेषरावाचा अर्ज टाकला आहे पोलिसहेडक्वार्टर्सकडे. आमच्या कुटुबान फार आग्रह धरला कातिनाथ तुझ्या आईच्या मागण्यावरून; पाहू अर्जाच काय उत्तर येईल ते ! ’

जरा वेळ स्तब्धता होती—

नतर फौजदारसाहेबानी सहज हॉटेलच्या मालकाना पृच्छा केली, ‘ शिवदासपत, तुमच्या पोरीच्या विवाहाची जोरात मोहीम काढली नाहीत अस दिसत. चुट्कीसरशी सुपारी फुटेल ! मुलगी आहेच तशी रूपान .! ’

आणि याच समयाला शेषरावाने कातीकडे पाहत दात ओठ चावले.

का ?—

* * *

पंधरवडयापूर्वीचीच हकीकत

शेषरावाने काही कबुतरें पाळलीं होती,—त्यातले एक मोटे गोंडस होतें दिसण्यात.

सर्वांगावर पाढरे ठिपके—मोहक चोंच—पख फडकावताना शरीर हलविण्याची मजेदार लकब.

शेषरावाला देखील त्याच्या सगळ्या कबुतराच्या थव्यात तेवढेंच प्यार होतें.

नव्हे, गावातलीं किती तरी माणसे त्या पक्ष्यावर खूप होतीं.

शिवदासपंत हॉटेलवाल्याची मुलगी राजुल त्यापैकींच एकजण.

तिची व शेषराजाची ओळख नव्हती.

कशी असणार ?

थोरामोठ्याचा शेषराव हा मुलगा, तेथला कायमचा रहिवाशीही नाहीं.

त्या गावाला येऊन फौजदाराना चार वर्षे लोटलीं होतीं. बदली न करता एकाच स्थळीं त्याना इतका वेळ ठेवले होते.

राजुलचा शेषरावाशी परिचय होण्याचे तसे कारण उद्भवले नाही.

कातिनाथ मात्र त्याच गावचा राहणारा राजुलचा बाळसवगडी—

त्याजजवळ तिनें एकदा स्वतःचा मनोदय सांगितला, 'काति, त्या फौजदाराच्या शेषरावाच कबुतर आहे बघ एक. अस्स सुदर आहे. कधीं तो त्याच्या घराच्या कम्पौन्डात कबुतरासमवेत असला, कीं पाहते मी .. काय झकास आहे ’

‘ हव आहे तुला ? ’

‘ कस आणणार तू ? ’

‘ माझी आई आहे फौजदाराच्या इथ कामाला तुझ्या बापाच्या हॉटेलात नोकरी लागण्याच्या आधी जात असे मी कधी कधी तिथ ! घेऊन येतो कपाटातल काढून नाहीं तर खरेदी करतो तुझ्यासाठी ’

‘ छे. छे., तस नकोच.. ! ’

‘ बाकी अशा उपायानी कबुतर घालवण्याइतका शेषराव साधासुधा नाहीं. तुला पाहिजे आहे म्हणून मागायला गेल तरी द्यायला बसलाय् तो ! मग ? ..’

कातिनाथ जरा वेळ थांबला व एकदम बोलला, ‘ हा हा, या प्रकारान नाहीं पण नक्की मिळवणार मी ते कबुतर माझ्या राजकुलकरता . ’

आणि कातिनाथाने पुष्कळ कबुतरे पाळलीं, कोणाला हें होता होई तों न समजेल अशी खबरदारी बाळगली त्यानें.

शेषरावाचीं कबुतरे आकाशांत विहरत असता कातिनाथानेंही स्वतःच्या पक्ष्यांचा ताफा सोडला.

ह्या घालमेलींत दोन ताडयातील कबुतरे चुकून आपले कळप बदलतात.

ही शर्यत काहीं आजच खेळली जात नव्हती. शेषराव नेहमीं करी हा उद्योग, एवढ्यासाठींच तर त्याला कबुतरे जवळ ठेवण्याचा चाळा होता.

प्रथम प्रथम कातिनाथाचींच पाखरें शेषरावाला लाधलीं.

तथापि शेषरावाचे अतिशय प्रिय कबुतर कातिनाथाच्या पक्ष्यामध्ये मिसळून आले.

बऱ्याच शर्यती झाल्या होत्या, प्रतिस्पर्धि कबुतराचा ताफा काति-नाथाचा आहे हें शेषरावाला उमगले होतें.

उत्तम पक्षी गमावल्यानें शेषरावाला चुटपुट लागली. त्यानें फिरून आपली कबुतरे गगनप्रांगणात सोडलीं.

परंतु कातिनाथाचा कार्यभाग संपला होता. त्यानें हा खेळच अजिबात बंद केला.

चिडलेला शेषराव लौकरच त्याला भेटला.

'काति, माझा पक्षी माझ्या हवालीं कर. त्याऐवजीं पाहिजे तितकीं कबुतर देतों.'

'मान्य झाल असत मला, पण आता तें पाखरू मजजवळ नाहीं. मी शर्यतच लावणार नाहीं यापुढ, तूच हवीं तर माझीं सर्व कबुतर ने..'

'माझा माल नाहीं मिळणार?'

'माझ्यापाशीं नाहींच त्याला काय इलाज?'

'कोणाला विकलस?'

'छेः छेः, अर्पण केल,'

'हः? कुठल्या ठिकाणी?'

'नाहीं सांगत. पण शेषराव, जाऊ दे ना! मीं जिंकल होत कबुतर. माझी दौलत झाली ती. बाकी केव्हा ना केव्हा तुला समजेलच माझी देणगी कुणाला लाभली तें, तरी मजकडून नाहीं कळणार.'

'ठीक आहे; तुझी आई आमच्या इथ वरकामाला आहे तिची चाकरी सुटली या घडीला; त्या मोटरस्टँडपासच्या हॉटेलातून तुलाहि कोलवतों...'

शेषराव जळफळत निघून गेला.

तरी पण जाताना तो बोललेल्या दोन गोष्टींपैकी काहींच त्याच्या हातून घडले नाही.

कातिनाथाच्या आईचें काम गमावले नाहीं याला कारण फौजदारीणबाई.

स्वभावानें अति सज्जन. उघडच आहे, शेषरावासारख्याच्या हट्टाकडे लक्ष पुरवून त्याच्याइतक्याच प्रेमळ अत.करणाच्या कातिनाथाच्या मातु:श्रीचा सहवास फौजदारीणबाई का सोडतील ?

शिवदासपताच्या हॉटेलातील कातिनाथाची चाकरीही शाबूद राहिली—

राजुलनें शिवदासपताला शेषरावाच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करावयास भाग पाडले हे काय सागायला पाहिजे ?

राजुलपाशी आपले कबुतर आहे ही बाब शेषरावाच्या ध्यानात आल्यावर—

त्याची नजर राजुलकडे वेधली, मग तो मनात म्हणाला, ‘ राजुल हें तर अधिक नाजुक कबुतर आहे. आजपर्यंत मला दखलच नव्हती याची!! हेंच कबुतर मी मिळवतो राजुलजवळची माझी प्यारी वस्तू माझा पक्षीही सहजासहजीं लाभेल . बस्स टरल, एका दगडान दोन पाखर !’

राजुल दरवर्षी कुस्त्या पहावयाला येत असे आणि म्हणूनच शेषरावाची शरीर कमविण्याची खटपट सुरू झाली होती.

* * *

‘ आई, मी तालीम करणार आहे उद्यापासून.’ फौजदाराच्या मुलाचा बक्षिस पटकावण्याचा निश्चय हॉटेलात कानावर पडला, त्याच दिवशीं रात्रीं कातिनाथ आपल्या मातुःश्रीला म्हणाला.

‘ होय ? तो शेषरावही रोज आखाड्यात जातो आताशा. त्यान भरवल वाटत तुझ्या माथ्यात हें वेड ?’

‘ वर्षअखेर कुस्त्या होतात ना आपल्या गावात, त्यात मी भाग घेणार आहें. कळवू नको ह कुणाला ! मी घरीच मेहनत करीत जाईन.’

‘ याच्या अगोदर नाहीं ही कल्पना सुचली ?’

‘ वाटत होत पूर्वी देखील; पण आई, एक सबब आहेच शिल्लक !

आपण गरीब! शिवदासपताच्या हॉटेलात मला फक्त जेवूनखावून काम —अन् तुझीही फौजदाराच्या घरी जें मिळत त्यावर जेमतेम गुजराण होते. व्यायाम म्हटला, कीं खुराक लागतो...'

'फौज्दार व त्याची बायको कित्ती चागलीं आहेत स्वभावान—त्याच्या कृपेन आपली स्थिति लौकरच सुधारेल. माझ्या विनतीला मान तुकवून त्यानीं शेषरावाबरोबर तुझाही अर्ज गुदरला आहे पोलिसात घ्याव म्हणून...'

'होय, आज फौजदारसाहेब तस म्हणत होते हॉटेलात. शेषराव मेहनत करून खाण्यासाठी आला होता त्याच्याबरोबर..'

'तुझी ईर्षा असेल तर तुझीही होऊ दे तालमीला सुरवात. फौजदाराच्या घरीं म्हैस आहे,—शेषराव दूध घेतो.'

'तो अमीर आहे आजकाल, परतु आपल दारिद्य! मराठी पाचवीतच मीं शाळा सोडली पोटाकरता '

* * *

'शेवटची झोंबी महत्वाची आहे. फौजदारसाहेबाचा मुलगा शेषराव अन् त्या स्टँडवरच्या शिवदासपताच्या हॉटेलातला पोऱ्या कातिनाथ .'

जिकडे तिकडे हीच कुजबुज चालली होती.

एका उच्चासनावरून फौजदारसाहेब कुस्त्या पाहत होते. त्याच्याच शेजारीं, जरीचा फेटा व रेशमी सदरा पेहरलेला शेषराव बसला होता. आजूबाजूच्या गावची प्रतिष्ठित मडळी तेथे हजर होती.

या सर्व समारभाचे सूत्रधार फौजदारसाहेबच, तेच तेथे जमलेल्या समुदायात मोठे अधिकारी.

प्रत्येक वर्षी लहान प्रमाणावर पार पडणारा कुस्त्याचा फड या बारीला त्याच्याच प्रयत्नाने एवढ्या अजस्र रीतीनें साजरा होत होता.

कांतिनाथ गावकऱ्याच्या घोळक्यात राहून प्रेक्षकाचे काम करीत होता. कां कोण जाणे?

त्याच्या तोंडावर उत्साह काडीमात्र दिसत नव्हता.

एका बाजूला बायकामडळीसाठी खास सोय करण्यात आली होती—राजुल

स्त्रियांच्या जमावात होती. मधून मधून तिचे डोळे कांतिनाथाला शोधीत होते.

शेषरावाच्या आसपासच तो असेल अशी राजुलची अटकळ.

अखेर कुस्तीच्या तयारीनें आलेला कांतिनाथ तिच्या नजरेला पडला.

शेषरावापेक्षा तो किती उंच मजबूत दिसत होता,

पण—

कांतिनाथाच्या चेहऱ्यावरील खिन्नता अवलोकून तिचें मुखकमल पार कोमेजलें.

त्या मुहूर्तालाच राजुलनें निकाल जाणला, व तोच खरा ठरला.

फौजदार–शिवदासपंत इकडल्या तिकडल्या चांगल्या दर्जाच्या व्यक्तींचा मेळावा. सर्वांसमक्ष कांतिनाथाची फजिती झाली.

कांहींना वाटलें, त्यानें मुद्दाम कुस्तींत अपयश घेतलें.

पण तेच लोक नंतर आपल्या मनाशीं बोलले 'असं कसं होईल? चांगलं शंभर रुपयांचं आंदण, नामी संधि, कुस्ती खेळायला सज्ज झालेला गडी.'

समुदायानें शेषरावाला हर्षभरानें वर उचललें.

राजुल माघारी परतली होती.

तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहणाऱ्या शेषरावाचे नेत्र आनंदानें थबथबत होते.

अगदीं सायंकाळच्या वेळीं राजुल कबुतराला दाणे घालीत होती. कांहींशी म्लान बनली होती ती.

कांतिनाथ तेथें सहज गेला.

'असं काय रे केलंस कांति आज? मला कळलं, तू मनापासून उतरला नाहींस आखाड्यात. खरंच काय झालं?'

पुष्कळ आर्जवून राजुलनें विचारलें; परंतु उसासे सोडण्यापलीकडे कांतिनाथानें प्रत्युत्तर दिलें नाहीं.

  

आणखी दोन महिन्यांनीं—

तेंव्हा कातिनाथ व शेषराव याच्यामधील खरा सामना गाववाल्याना पहाण्यास सांपडला.

नुकत्याच मिळालेल्या विजयानें शेषरावाला बेफाम केलें होतें.

राजुलकडे विशेष लक्ष पुरवू लागला होता आताशा तो——

तिचें कबुतर पण त्याच्या दृष्टींतून निसटले नव्हतें.

राजुल पायवाटेनें चालली होती कोणाच्याशा मळ्यावर फळे आणायला.

तिचें लाडके कबुतर खाद्यावर होतें तिच्या.

गावाबाहेरील आडरानाचा मार्ग, अशाच सधीसाठीं हपापलेला होता शेषराव.

वास्तविक त्याला कबुतराअगोदर राजुलशींच लगट करावयाची होती.

तथापि पुढच्या कृत्याचा प्रस्ताव म्हणून कीं काय, राजुलच्या खाद्यावर हात मारून त्यानें कबुतर पकडलें.

भिऊन राजुल चार पावलें मागे सरली.

‘ माझे आवडते पाखरू ! ’

‘ घाबरू नकोस, राजुल . देईन मी तुला हें कबुतर, पण काय ग. . .मी इतका धडपडतों, पण तू बोलायलाही कबूल नाहींस नुसती, सदा चुकवतेस मला; समजेल बर, मी तुझ्याशींच लग्न कराव अशी परवा माझ्या वडिलानीं कल्पना काढली, आणि त्याला मीं जोरदार समति दिली, नाहींच ना वळत अद्याप ? जातो तर मग हें कबुतर घेऊन. ह्या निमित्तानं तरी माझी आठवण होईल वारंवार ! ’

राजुल बावरली. मागें न पाहता धूम ठोकली तिनें घराच्या दिशेला व लगेच मोटार स्टॅंडवरच्या हॉटेलमध्यें ती गेली.

कांतिनाथाला तिनें कबुतर आणण्यास सुचविलें.

शेषराव गावांत येत होता, वेशीसमीपच्र त्याची व कातिनाथाची गांठ पडली.

कबुतर मोकळें केलें कातिनाथानें.

तेथें येऊन ठेपलेल्या राजुलच्या खांद्यावर पाखरू आपोआप जाऊन बसलें.

शेषराव सतापला.

तेव्हांच झोंबाझोंबी घडली उभयतांची.

सारा गाव जमला.

अन् ‘ कातिनाथच खराखुरा मर्द आहे ! ’ असे उद्गार हरएक इसमाच्या मुखावाटे निघाले.

कातिनाथ शेषरावाला जाहीर रीतीनें म्हणाला, ‘ मीं तालीम केली, देहाला बळकटी आणली. तुमच्या घरचच दींड दीड शेर दूध आई मला पिण्या-साठीं देई. फौजदारसाहेव, . तुम्ही फार सुस्वभावी माणस. तू व मी सम-बल वाटलो, यास्तव आपली कुस्ती ठरली; तुझ्याइथचंच खाऊन तुजवर मजल मारण मला अप्रशस्त दिसल, तेव्हाच मी आपण होऊन जमिनीला पाठ भिडवली—’

इतके होई तों फौजदारसाहेबाच्या कानावर कुरबुर पोंहोंचली.

त्यानीं शिपायाकरवीं दोघानाही बोलावून आपल्या खोलींत नेलें.

मोठ्या खुशींत स्वारी म्हणाली, ‘ अरे लेकानो, भाडतां काय ? ’

‘ हें तुम्हाला दोघानाही पोलीसात घेण्याबाबतच्या अर्जांना उत्तर आलय् ; नवीन भरती व्हायची आहे, तपासणीसाठीं हेडक्वार्टरला चालू लागा आताच .’

* * *

कातिनाथ पोलीसात निवडला गेला.

शेषरावाची उची अपुरी पडली.

शिवदासपताला कातिनाथ हा जावई पटला.

बापाचा हा मनसुबा राजुलनें एकीकडे भेटून कळवला, तेव्हा काति-नाथानें काय उद्गार काढले ?

‘ राजुल, हें पहा मी दिलेल पाखरू आहेच तुझ्यासन्निध ; आधीं एक सुंदर कबुतर दिल, तेव्हा दुसर लाभत...’

राजुलनें लाजून खालीं पाहिले.

कबुतर आळीपाळीनें दोघाकडेही पाहत असलेलें तिला आढळलें.

## नाताळांतील भेट : : : २

नाताळचे दिवस जसजसे जवळ येत चालले, तसतसे केदारपत अधिकाधिक फिकिरींत पडू लागले

ते पुण्यास असलेल्या इरिगेशन डिपार्टमेंटच्या ऑफिसात एक हेडक्लार्क होते. त्याच्या तोडीचे इतर हेडक्लार्क व अकौन्टट मडळी त्या ऑफिसात पुष्कळच होती. पुण्यास मुख्य कचेरी असल्याकारणानें काम जास्त होते म्हणून इरिगेशनखात्याच्या इतर गावीं असलेल्या स्टाफमध्यें जरी एकच हेडक्लार्क चालत असे, तरी शहराच्या ठिकाणीं ऑफिसर लोकाचा मोठा भरणा लागत होता.

केदारपत हे हलाखीच्या स्थितींतून वर आले होते. बरेच दिवस त्यांनीं एका तालुक्याच्या गावीं उमेदवारी केली. पुढें तशाच कांहीं वशिल्यानें ते पुण्याच्या इरिगेशन डिपार्टमेंटमध्ये क्लार्क म्हणून चिकटले व कामात हुषार असल्यामुळें थोड्याच अवधींत ते हेडक्लार्क झाले.

बरींच वर्षें लोटलीं. पुण्याहून दुसऱ्या कोणत्याच ठिकाणीं त्यांना बदल-

ण्यांत आलें नव्हतें. त्याना पुणेंच पसत होतें. त्याना म्हटल्यापेक्षा त्यांच्या कुटुंबाला पुणें हवें होतें असे नमूद करणें सत्याला अधिक धरून होईल. त्याच्या बायकोचे दोन जाणते भाऊ त्याच्या घरींच शिक्षणाला राहिले होते.

केदारपतानीं तिसरें लग्न केले होते. दोन बायका मेल्यावर त्यांना विवाह करू नये असेंच वाटले. पण त्याच्या म्हाताऱ्या आईचा आग्रह पडला. आपल्याला नातवड नाहीं, वश पुढें चालायचा नाहीं, वगैरे सागून तिनें एक खेडेगावातली मुलगी पाहिली व केदारपत तिसऱ्यादा बोहल्यावर चढले!

लग्न करण्यास केदारपत तयार नव्हते याचें एक आतले कारण म्हणजे त्याना असलेले वडिलार्जित तीन हजाराचे कर्ज. त्याच्या पित्यानें सावकाराचे सातशे रुपये काढले, त्याचे व्याजासुद्धा तीन हजार झाले. आपल्या म्हाताऱ्या आईला त्यानीं हें सागितले, तेव्हा ती बोलली, "अरे, तुला दीडशें रुपये पगार. घरात कष्ट करायला सरकारी पट्टेवाला, अन् इतक असून अशा क्षुल्लक सबबीकरता विवाह न करून वशाची वेल खुडतोस?"

केदारपत उत्तरादाखल आईला म्हणतो, "एकदा प्रपच वाढता झाला कीं कर्जाची गोणी हलकी करताना नाकीं नऊ यायचे."

आणि विवाह झाल्यावर केदारपताच्या या शब्दाचा प्रत्यय आला. त्याना चार मुले झालीं. थोरली मुलगी सहा वर्षाची होती. खेरीज बायकोच्या लहरीखातर आलेले तिचे दोन भाऊ होतेच. इतक्या कुटुबाचा भार व कर्जफेड यामुळे केदारपताना दिसायला जरी दीडशें रुपये पगार होता, तरी त्यातील दिडकी उरत नव्हती. मोठ्या मेटाकुटीनें जमा व खर्च याचीं तोंडें मिळत होतीं.

त्याच्या घरात काम करण्यास असलेला सरकारी पट्टेवाला जानोजी याला हें सर्व समजत होतें. केदारपताचा सीधा स्वभाव त्याला फार पसत होता. तो स्वतःही सरळ मनाचा होता. पधरा रुपये पगार मिळे, त्यातले दहा रुपये तो सागलीला त्याचें घर होतें तेथें आपल्या आईबापांना पाठवी व बायको आणि तो पाच रुपयात पुण्याला ससार करीत होते.

आपल्या कुळाचा जानोजीला अभिमान होता. सागलीच्या सरदार पटवर्धनाशीं असलेला त्याच्या घराण्याचा कोणता तरी महत्त्वाचा सबध तो

सदोदित सांगत असे. त्या अभिमानाला साजेल अशी त्याची वागणूकही होती. आपल्या बायकोला किंवा आईला त्यानें कोठें मोलमजुरी करू दिली नाहीं. ऑफिसातल्या अम्मलदारापाशीं इतर गड्यासारखें त्यानें दिवाळीचें कधीं पोस्त मागितले नाहीं. इतर ऑफिसर त्याला आपण होऊनच ते देत. केदारपतही केव्हा आठवण झाली व त्या वेळीं चवलीपावली खिशात असलीच, तर जानोजीच्या हातावर पोस्त ठेवीत. केदारपताचें पोस्त दुसऱ्या हेडक्लार्क अकौन्टट याच्या पोस्तापेक्षा कमी असे. पण म्हणून जानोजीची केदारपतावरील भक्ति कधीं कमी झाली नाहीं. त्याच्या घरातील पैशाचा ओढगस्तपणा तो डोळ्यांनीं पाहत होता.

केदारपत इतर ऑफिसराच्या बरोबरीच्या दर्जाचे असून पोषाखात साधेसुधेच राहत. कोणी त्याच्या तोंडावर या बाबतींत प्रश्न केला तर आपण गरीब आहोंत, असें ते स्पष्ट सागत. त्याच्या घरची परिस्थिति ज्याना माहीत नव्हती, त्यानी केदारपताना चिक्कू ठरवलें होतें.

तसें म्हटलें, तर केदारपताना वरच्या युरोपियन साहेबास दर नाताळाला पधरावीस रुपये किंमतीची फळफळावळ व मेवामिठाई भेट म्हणून देण्याची ऐपत नव्हती, पण त्याना साहेबाचा स्वभाव माहीत होता. खाद्य मिळेल तशी ऑफिसात वागणूक ठेवायची हा साहेबाचा खाक्या सर्वांच्याच परिचयाचा होता. याकरिता साहेबाच्या बगल्यावर खिसमसच्या भेटी सारेच पाठवीत होते. ऑफिसात मात्र या बाबींची वाच्यता मुळींच होत नव्हती.

प्रत्येक नोकर आपल्या प्राक्तनाला भीत होता. प्रत्येकाचा काहीं तरी स्वार्थ होता. कोणाला प्रमोशन पाहिजे होतें, तर कोणी अजून कायम झाले नव्हते. केदारपताना अद्याप हेडक्लार्कची कायम जागा मिळाली नव्हती. त्यानीं बरेच अर्ज केले. काहीं परत आले, बाकीचे फाइलला लावले गेले.

याशिवाय ऑफिसात काय घडेल याची केदारपताना काळजी होती. सरकारी ऑफिसें म्हणजे राजकीय खलबतखानेच ते. कोण कधीं काय चुगली करील व त्याचा काय परिणाम घडेल ही धागधुग ऑफिसातील हरएक मनुष्य सहजच करीत होता.

एकदां, कॉंग्रेसची चळवळ सुरू होती त्या वेळीं, एकानें साहेबाजवळ

सांगितलें कीं, केदारपंत हे चळवळीस अप्रत्यक्ष मदत करतात. साहेबाला हे खरेंही वाटलें. कारण एकूण एक हेडक्लार्क व अकौंटंट याच्या स्टाफमध्यें सूट घालून न येणारे तेवढे केदारपतच होते. साहजिकच त्याच्या साध्या राहणीच्या बुडाशीं असल्या धर्तीचे विचार असणें अशक्य नाहीं असा साहेबानें कयास बांधला व केदारपताना दुसऱ्याच दिवशीं त्या अनुरोधानें विचारलें " ए केदारराव, गाधीच्या चळवळीविषयीं तुझ काय मत आहे ? "

केदारपत जात्या इतके बाणेदार होते कीं, केवळ कामांत वाकबगार असल्यामुळेंच त्याचा या नोकरींत टिकाव लागला असें म्हटले पाहिजे. चाललेल्या चळवळीबद्दल त्याच्या मनात सहानुभूति होती. साहेबाचा सवाल ऐकताक्षणींच ते उद्गारले, " हा इथ उत्तर देण्याजोगा प्रश्न नाहीं."

या स्वाभिमानी जबाबानें साहेब किंचित खवळला व नाताळातली भेट येईपर्यंत त्याची केदारपताशीं धुसफुशीची वर्तणूक होती.

असा अनुभव वेळोवेळीं येत असल्यामुळें साहेबाला राजी राखण्यासाठीं नाताळात काहीं तरी पाठवण्याचा केदारपताचा नेहमींचा शिरस्ता होता.

परतु या नाताळात फळाची व मेवामिठाईची करडी घ्यायला पैसेच शिल्लक नव्हते. डिसेंबरच्या दुसऱ्या तारखेला सर्व पगार खलास झाला होता.

बरें, कोणाजवळ उसने पैसे मागावे, तर ते वेळच्या वेळीं न फिटले असता नापत पदरी यायची, म्हणून तोही बेत त्यानीं रहित केला होता.

ते मोठया कैचींत आले होते. बायकोपाशीं व आईजवळ स्वतःला पड-लेलें कोडें ते सारखे कथू लागले.

घरात कामाला असलेल्या जानोजीनें जेव्हा केदारपताची कुरकूर ऐकली तेव्हा त्याला रहावेना. त्याचा पगार होऊन पधरा रुपये त्याच्या हातात एकदोन दिवसापूर्वीच आलेले होते. त्यानें सागलीला आपल्या आईबापा-कडे अजून मनीऑर्डर केली नव्हती. पाच–पांच रुपयाच्या तीन नोटा त्याच्या ट्रकेंत शाबूत होत्या.

त्यानें केदारपताना आपण होऊनच त्या आणून दिल्या. केदारपंत पैसे घेईनात. त्यानें अति विनवणी केली. तो म्हणाला, ' रावसाहेब, तुम्हांप्रमा-णंच मीही घरंदाज आहें. वेळअडचणीला गरज भागवण हें प्रत्येक कुल-

शीलाच्या माणसाचं काम आहे. तेंच मी बजावीत आहे. माझे पैसे अम क्याच वेळेला द्या, अशी माझी तुम्हाला अट नाहीं; पण पैसे घ्या हें मात्र काकळून सागण आहे. केव्हाही पधरा रुपये परत करा, पण या घटकेला माघारी घेऊ नका. मी अटीला पेटलों आहे'

आता केदारपताना पधरा रुपये स्वीकारण्यावाचून इलाज नव्हता

नाताळांत त्यानीं दरसालप्रमाणें अननसाचे डबे, काश्मीरचीं सफरचदें, मॉरीशसचीं द्राक्षें, युरोपियन लोकाना हमखास आवडणाऱ्या पोपया, इत्यादींनीं करडी भरली. दुसरी निवडक मिठाईची एक करडी सुशोभित कागदाच्या वेष्टनात बाधली. एक सहा आण्याचें ख्रिसमस् कार्ड खरेदी केलें व त्यावर आपलें नाव लिहून सर्व जिनसा साहेबाच्या बगल्यावर रवाना केल्या.

जानोजीनें दिलेल्या पधरा रुपयात सर्व बेन ठाकठीक जमला.

दिवस येत होते आणि जात होते. केदारपताच्या हाताला जानोजीचे पैसे देण्याची काहीं सवड होत नव्हती. त्याचे पधरा रुपये ते मुद्दाम बाजूस काढून ठेवीत, पण एखादे विनिमयाचें कलम आकस्मिक उद्भवे व त्या कामीं जानोजीचे पधरा रुपये त्याना वापरावेच लागत. अशा वेळी ते म्हणत, " जानोजी आपलाच आहे. पैसे इथ डुबणार नाहींत हें तो पक्क जाणून आहे. देऊ सवडीन "

जानोजी स्वत' पधरा रुपयाबद्दल तोंडावाटे उच्चारही करीत नव्हता. तो हलक्या नोकरीवर राबत होता, तरी कुळाची त्याला चाड होती. सागलीच्या सरदार पटवर्धन घराण्याशीं आपली निकटची घसट तो फार अभिमानानें ज्याला-त्याला सागत होता व अशा मानीपणास केदारपताजवळ पधरा रुपयाची याचना करणें कधींच रुचणे शक्य नव्हतें.

वास्तविक त्याला पैशाची वाण होती. ज्या महिन्याला त्यानें केदारपतांना पधरा रुपये दिले, त्या महिन्याला त्याला आपल्या सागली येथें असलेल्या आईबापाना एक छदामसुद्धा पाठवता आला नव्हता. खर्चासाठीं सावकाराचे पैसे घेण्याबद्दल त्यानें आईबापाना पत्रद्वारें कळवलें होतें.

जानोजीला केदारपताचा स्वभाव माहीत होता. या ठिकाणीं पंधरा रुपये

बुडायचे नाहींत अशी त्याची खात्री होती. यामुळें केदारपताजवळ उसन-वारीचा सवाल करणे आणखी जड झालें होतें.

केदारपत जानोजीचे पधरा रुपये विसरले नव्हते. तो रोज कामाला येई, तेव्हा त्याला ते पैसे देईन म्हणून बजबजावून सागत, परतु खर्चांचीं सदरें इतस्तत: विखुरलेलीं असल्यामुळें त्याना तसें करणें काहीं बनत नव्हतें.

असाच काल चालला असता एकदा अचानक रीतीनें केदारपताना नगरला जाण्याचा हुकूम मिळाला. सामानाची बाधाबाध होऊन बदलीच्या गावीं जाण्यासाठीं ते परिवारासुद्धा मोटरींत बसले. जानोजीनें केदारपताचें बाजबाजले हालवण्याच्या कामीं फार मेहनत घेतली. जाताना तरी हेडक्लार्क-साहेब आपले रुपये परत देतील असा त्याला विश्वास वाटत होता. तथापि केदारपतानीं त्याला मनिऑर्डरने पैसे धाडण्याचे आश्वासन दिले व जानो-जीचा पत्ता त्यानीं टिपून घेतला.

जानोजीला पुष्कळ वाटले की स्वत.ला कर्ज झाल्याचे केदारपताना सागावे, पण त्याचे मोठे मन त्याला तसे करू देईना. शिवाय केदारपत ओढगस्त स्थितीत आहेत हे तो समजत होता उसने केव्हा ना केव्हा फिटेल इतका त्याला भरवसा होता. परतु रुपये जितके लवकर येतील तितका त्याला आनद झाला असता. अशी जानोजीची त्या समयींची स्थिति होती.

अखेरीला केदारपताना हेडक्लार्क म्हणून कायम न होताच सेवानिवृत्त व्हावे लागले. त्यातल्या त्यात सुदैव हें कीं खटपट करून हेडक्लार्कच्या पगारा-वरच पेन्शनीला मान्यता त्यानीं मिळवून घेतली.

त्याची थोरली मुलगी आता लग्नाला झाली होती. नोकरीवर असतानाच त्यानीं तिच्याकरिता स्थळ पाहण्यास प्रारभ केला होता. रिटायर्ड झाल्यावर केदारपतानी तो उद्योग जोरानें सुरू केला.

काहीं रुपयाची पेन्शन त्यानीं विकली. बारारों रुपये त्याबद्दल त्याच्या खिशात पडले. पण लगेच खर्च उभा होता. मुलीला एक उत्तम स्थळ नक्की होत होतें. मुलगी रूपानें सुमारच होती, म्हणून पैशाकरिताच सर्व वाटा-घाटी थबकून राहिल्या होत्या.

केदारपताची हुंड्याची मागणी कमी होण्यासाठीं घासाघीस चालली होती.

पण वरपक्ष निकराला पेटला. केदारपताच्या पत्नीनेंही 'मनगटाला मनगट जुळत आहे, कुडली सोळा आणे जमत आहे, तेव्हा पैशासाठीं मागेपुढें पाहू नये' असे त्याना गळ घालून सागितलें होते.

शेवटीं हुडा नक्की झाला. बाराशें रुपयातून अवघे पाचशें रुपये उरत होते. त्याचे नवऱ्या–मुलीला दागदागिने घालण्यात यावे असें ठरले.

फुकट सल्ला देणाऱ्या अनेक स्नेह्यापैकी एकानें केदारपताना सागलीला सोनें बऱ्या भावाने मिळतें अशी बातमी दिली.

माघात मुहूर्त ठरला होता. दागिने अगोदरच तयार असणे जरूरीचें होते. सागलीला जाऊन चागले दागिने मिळाल्यास आयते, नाहीं तर घडवून घेण्याचा केदारपताचा विचार होता. म्हणून नाताळातच रिटर्न तिकिटाच्या सोयीचा फायदा बघून केदारपत सागलीला गेले.

चौकशी करीत सराफ बाजारात आल्यादर तेथील एका ठळक दुकानात त्यानीं सोन्याच्या भावाबद्दल मालकाशीं बोलणे सुरू केलें.

इतक्यात दुकानात घाईघाईनें एक इसम शिरला व थेट मालकाला हातातील कागद दाखवीत बोलला, "हें पहा सरकारी हुकूमपत्र. जप्ती आणली आहे. जानोजीच्या घराचा व चीजवस्तूचा लिलाव पुकारला आहे. तुम्ही समक्ष चला."

मग सराफ उठत केदारपताकडे वळून म्हणाला, "माझा गुमास्ता तुम्हाला काय हव ते देईल. मी जरा कामाला जाऊन येतों."

जानोजीचें नाव कानीं पडल्यावर केदारपत दचकलेच होते. तोही साग-लीचाच राहणारा हें त्याना माहीत होते. कर्णपथावर पडलेल्या एकदर मज-कुराचा सगतवार अर्थ लावून ते बोलले, "चला, मीही येतों तुमच्या-बरोबर; मग माल घेईन किंवा ऑर्डर देईन. बिघडल कुठें?"

* * *

झोपडीबाहेर खालीं मुंडी घालून उभा असलेला जानोजी पाहून केदार-पताचें हृदय द्रवून गेलें. जानोजीच्या शेजारींच त्याची बायको अश्रु गाळीत उभी होती. त्याची म्हातारी आई ओक्साबोक्शीं रडत होती.

झोंपडींतील हडींमडकीं, चिरगुटाच्या लक्तऱ्या सर्व बाहेर काढण्यांत आले होते व झोंपडीच्या जागेसुद्धा एकदर सामानाचा एका गटानें लिलांव होत होता.

केदारपतानी जानोजीसमीप जाऊन त्याला गदगदा हालवले, तशी त्यानें मान वर केली.

"कोण रावसाहेब ? आणि इथ ! या वेळीं ?" त्याच्या डोळयांवाटे आसवे ओघळू लागली. पुन्हा त्याने आसपास जमलेल्या लोकाकडे पाहिलें व शरमेने पायाकडे नजर फिरविली.

"जानोजी, तू पुण्याच्या ऑफिसात चाकरीला होतास ना ? इकडे कसा आलास ? ही जप्तीची अन् लिलावाची काय भानगड आहे ?"

जानोजीनें एकदम केदारपताच्या डोळयाला डोळा दिला. एकदा सराफाकडे पाहिले व उद्वेगाने तो म्हणाला, "रावसाहेब, सर्व सागतों तुम्हाला... त्या वेळी मीं नाताळच्या अगोदर पधरा रुपये तुमच्या हवालीं केले..."

"जानोजी" केदारपत आश्चर्यानें उद्गारले, "त्या साऱ्याच मला विस्मरणच पडल होत मध्यें तूही मला पत्र लिहिल नाहींस...मी आपला ससारातील घालमेलीच्या चक्रात..."

"ऐकून तर घ्या, रावसाहेब. तुम्हाला पगाराचे सर्व पैसे दिल्यावर मला खर्च करायला पुढील महिन्याच्या पगारापर्यंत वाट पाहण आल. पुण्याला मी स्वल्प व्याजान रक्कम काढून व तिची परतफेड करून कसा तरी निभावून निघालों. पण इकडे आईबापाना शिवराई देखील पाठवतां आली नाहीं. बाप आजारी होता; आई त्याची शूश्रूषा करीत होती. पोटापेक्षा औषधपाण्यालाच त्याचा जास्त खर्च होत होता. मी त्याना कोठून तरी दहा रुपये कर्जाऊ घेण्याचं पत्र लिहिल. त्यानीं या सराफाचे पैसे जबर व्याजबट्टा कबूल करून काढले. वाडवडिलापासून सोन्याच्या देवघेवीमुळें या सराफाचा व आमचा ऋणानुबंध होता. आधींच मला मिळणाऱ्या पगारांत या महिन्याची त्या महिन्याला महामुष्किलीन गांठ पडे; पुण्यासारख्या शहरात आम्हीं पांच रुपयांवर उगवला दिवस ढकलीत होतों.

त्यात माझा स्वाभिमान. मी बायकोला किंवा आईला कधी राबू दिलें नाहीं. बापाला म्हातारपणचेच आजार लागले होते, तरी त्याच्या दवापाण्याची मीं हयगय केली नाहीं. पुढ दुखण्यानच म्हातारा मेला. आपण आता कर्ते झालों, आईबापाना कष्ट पडू द्यायचे नाहींत, ही माझी मोटी उडी. ऋण वरचेवर वाढत होत, माझ्याकडून म्हणण्यासारखी काहींच फेड होत नव्हती. दर तीन वर्षांनी मी चढल्या रकमेच्या प्रॉमिसरी नोटा लिहून देत होतों. तुम्हाला सर्व कळवून टाकाव असा विचार येई, पण मन कचरे. आम्ही खानदानीच्या वशाचे आहों. सरदार पटवर्धनाची अबारी आम्हीच सजवीत होतो. आता तो मान भाऊबदाकडे गेला आहे. कर्ज फुगल, तस सराफानीं सरकारात माझ्या नावाने अर्ज केला. ऋणकरी म्हणून नोकरी जाण्याची सरकारातून प्रथम धमकी मिळाली व परिणामीं तेंच झाल. नतर कामधदा मुळी लागला नाहीं."

"किती आहे देण तुला ?" केदारपतानीं विचारले.

"चारशें वीस रुपये."

"हात्तिच्या, इतकच ना ? माझ्या पायी तू चिखलात रुतला होतास " असे म्हणत केदारपत सराफाकडे जाऊ लागले.

सराफाचे त्याच्याकडे अवधान नव्हते. लिलावाचे आकडे तो आतुरतेनें ऐकत होता. केदारपताची व जानोजीची जान पछान पाहून त्याने क्षणभर विस्मय केला व लगेच तो लिलावाच्या उलाढालीत रमला. अद्याप तीन वार केले गेले नव्हते.

केदारपतानीं सराफाजवळ जाऊन त्याच्यासमोर चारशे वीसाच्या नोटा धरल्या व तावडतोब लिलाव बद व्हावा असे फर्माविले.

सराफ नुसता पाहतच राहिला, म्हणून तर नोटाचे बडल ताब्यात घेऊन त्याची पावती देणे त्याच्याकडून चटकन झाले नाहीं.

गोळा झालेला जमाव आश्चर्य करीत हळूहळू ओसरू लागला. नोटा पुनः एकवार मोजून झाल्यावर सराफ केदारपताना बोलला, "चला आता दुकानात; तुम्हाला लग्नासाटीं दागिन्याची खरेदी करायची आहे ना ? बाकी फारच कनवाळू बुवा तुम्ही ! मलाही जानोजीची दया येत नव्हती

अस नाहीं; पण आमचा हा सावकारीचा व्यापारच पडला. नेहमीं नेहमीं अशाशींच संबध; बर उचला पाय झट्झट्, तुमच्या मुलीच कार्य आहे म्हणता. यात तुम्हाला दागिने फक्कडच लागणार!"

"तुम्ही एकटेच जा सराफकट्टयावर व आपला निष्ठुरपणाचा सावकारीचा धदा आणि सोन्याचांदीचा उदीम करीत बसा." असें अत्यत तिरस्कारानें बोलून केदारपतानीं सराफाकडे पाठ फिरवली.

जानोजी केदारपताच्या सन्निधच हळूहळू येत होता. त्याच्यापुढें केदारपतानीं जवळ उरलेल्या ऐशीं रुपयाच्या नोटा भिरकावल्या. जानोजीला ती देणगी नाकारायची होती, त्याच्या बायकोला झाल्या प्रकाराबद्दल कृतज्ञता व्यक्त करायची होती. अजूनपावेतों शोकात बुडालेल्या जानोजीच्या आईला केदारपताची करणी नुकतीच उमगून आल्यामुळे हर्षभराने त्याच्या चरणावर लोटांगण घालण्यासाठीं म्हातारी हलके हलके केदारपत उभे होते त्याच दिशेला येत होती. पण

केदारपतानीं खिशातील रेल्वेचें नाताळातील रिटर्न तिकिट चाचपलेंसे केले व तडक स्टेशनचा रस्ता धरला. मागे वळून देखील पाहिले नाहीं.

एका कुळवताच्या गरजेला दुसरा कुळवत जागला.

# वज्राघात : : : ३

“ काय करीत असता तुम्ही ? ”

‘ कशाला हव्यात लोकाना नसत्या चौकशा ? ’ एरवीं मी मनाशीं म्हणायचा !

पण ती वेळ तशी नव्हती.

वीस–एकवीस वर्षांची मुलगी आपण होऊन मला प्रश्न विचारण्यास उद्युक्त झाली होती.

कॉलेजात असल्यापासून असले प्रसग मी कितीतरी कल्पिले असतील !

कुणीतरी मुलीनें आपली स्निग्धपणानें पूसतपास घ्यावी ! आपल्यावर तिनें अनुरक्त व्हावे, असें मला नेहमीं वाटे !

पोरींच्या डोळ्यात भरावे एवढ्यासाठीं उत्तमोत्तम पोषाख करीं मी. तथापि मुली ढुकूनहि मजकडे पाहीनात. अखेर मीच एक दोघींशीं ओळख पाडण्याचा यत्न केला, तरी त्या दिवट्यानीं मला झिडकारलें.

तेव्हापासून माझी अशी तक्रार होती, कीं ' लव्ह–अफेअर्स ' जोमात चालायला मुलींच्याकडूनच उत्तेजन मिळत नाही.

—आणि मी बी. एस्सी. होऊन कॉलेज सोडले–जीवित–युद्धात उडी टाकली.

—व आजतागायत ही मुलगी भेटेपर्यंत माझी प्रेमोत्तर विवाहाबद्दल तीच सबब कायम होती.

आता मात्र मनाला विशेष आनद वाटला.

झाले काय ?

मी नगरच्या मोटारीत बसलो होतो. माझ्याच समोर एक तरुणी येऊन टाकली.

प्रवासास प्रारभ झाला.

मध्यतरीं कोणच्यातरी गावी त्या युवतीला सत्रे विकत घ्यावयाची होती .मोटर सुरू होण्याच्या अगदी बेतात. ...

मीच मग जलदीने तिला सत्रे आणून दिली.

प्रथम परिचय इतकाच. ...

नतर तिने सत्र्याच्या फोडी माझ्यापुढे करीत विचारले, ' तुमचं नाव काय ? '

मी उत्तर दिले.

' मुले बाळे किती आहेत ? '

' अहो लग्नच झाले नाही तर हा तपास कशाला ! '

वास्तविक त्या तरुणीनें इथेच थाबणें युक्त होतें. पण माझ्या कामधद्याबद्दल तिचा नतरचा सवाल आला.

मला राग येण्याऐवजी बरेंच वाटले.

" फोटोग्राफर आहें मी. नगरला स्टूडियो आहे. पुण्यास कांहीं निमित्तानें येणें घालें."

" बरें, आईबाप कुणी..."

" हो, दोघेहि हयात आहेत."

पुष्कळ बोललो आम्हीं .

खरें सागू का ?

तिच्या स्वरूपाकडेच माझे सारे ध्यान वेधले होते. तोडाने मी उत्तरे बडबडत होतों तिच्या प्रश्नाना. परतु माझी मन.पूर्वक कामगिरी नेत्राद्वारेच चालली होती.

इतकी बोलकी, चचल,–अगदीं मला हवी तशी मुलगी माझ्या बघण्यात आली.

—ती फार प्रेमळ दिसली मला.

ज्या प्रीति–विवाहाकरिता मी आतुर होतो तिथपर्यंत माझी मजल पोचेल ?

मी त्या तरुणीची मला मिळेल तेवढी माहिती अतःकरणावर कोरून ठेवीत होतो.

तिला नगरच्यापुढें जामखेडला जायचें होतें.

—तिचें नाव नदिनी.

आजोळ होतें जामखेडास तिचे—

ती पुण्याला रहात असे. तिथेच इग्रजी शाळेत जात होती...

खरेच आपल्या चित्ताचे विश्रामस्थान नदिनी होऊ शकेल ?

कसे कळणार आपणास ? तिलाच तसे विचारले पाहिजे.

मोटार भरधाव पळत होती. आम्हा उभयताच्या आसपास पॅसेंजरची गर्दी होती.

पण ते सगळे गावढळ दिसले मला

या अशिक्षितांना मी व नदिनी परस्पराशी सभाषण करीत आहोंत, याचा अचबा वाटला असेल...

त्यानी नाहीतर अशी कल्पना उराशी बाधली असावी, की आम्ही नात्याचींच असणार...अगर आमची दाट ओळख निघाली असावी अचानक रीतीनें.

त्याचा तो तर्क तसाच राहू देणे उचित होते.

बोलताना मधून मधून इग्रजीहि शब्द आम्हीं वापरीत होतों.

खरेच नदिनीला इग्रजी भाषेत माझी मनोवेदना निवेदू का ?

पण नको ! नदिनी काय म्हणेल ! अवघ्या दोन तीन तासाचा परिचय अन् एवढ्यात प्रेम .....

मी बाहेर मारे जोरजोराने नदिनीशीं जाब जबाब करीत होतो पण आंत शकाकुशकाचे नुसते काहूर माजलें होते...

तथापि देवाने माझी हाक ऐकली असेच मी म्हणतो.

कारण अर्ध्या वाटेतच–रानात मोटारचें इजिन बिघडलें.

काळोखहि येऊ लागला होता तेव्हा ..

दुसरी मोटार आली गेली तरी उपयोग नव्हता–गाड्या भरगच्च असायच्या ! ह्या स्थितीत त्यामध्ये आमचे उतारू कोण घेणार ?

—ड्रायव्हर व क्लीनर नादुरुस्त यत्राशीं हुज्जत घालू लागले.

—नजीकच एक चहाचे दुकान होते. तिथे सर्वांनी रात्रींचा मुक्काम ठोकावा असे ठरले

चादणें शुभ्र होते.

मी व नदिनी तिच्याच आग्रहावरून एकात स्थळीं फिरायला गेलों.

सुसधि चालून आली होती.

तिचा फायदा घेण्याचा मी निश्चय केला.

स्वतःचें मन नदिनीसमोर मोकळे करण्याची इच्छा मनस्वी बळावली–

शब्द ओठाजवळ येत होते. पण ते बाहेर सरकेनात.

आम्ही प्रशात जागीं गप्पा मारीत होतों.

मरतेशेवटी मनाचा धडा करून अतरींचे बोल उच्चारणार तोच—

"हा पाहिलात का फोटो ?" नदिनी पोलक्याच्या खिशाकडे हात नेताना म्हणाली–

मी बघण्यासाठीं छायाचित्र उत्सुकतेनें घेतले.

"हीच माझी मामेबहीण हो. जामखेडला असते. हल्लीं मी पुण्याला मास्तरीण आहे कन्याशाळेंत ."

नन्दिनी इग्रजी शाळेंत विद्यार्थिनी म्हणून जात नाहीं एकूण...माझ्या प्रियकरणीविषयींचा अतःकरणातील एक गैरसमज मी दूर केला.

"...घरात कर्ते माणूस नाहीं कोणीच. प्रपचाचा भार मजवर आहे' माझे ' लव्ह मॅरेज' व्हायचे आहे एका प्रोफेसराच्याबरोबर.. झालेच असते एव्हाना. पण मातोश्रीचे म्हणणे कीं अगोदर तिच्या वधुकन्येला उजवून टाकावे मी! आमच्या आजोळची फार दैनवाणी परिस्थिती आहे सध्या! पत्कराल तुम्ही माझ्या मामाच्या लेकीस? फोटो तर दिलाच आहे. नतर ती प्रत्यक्षच तुम्हाला दाखवीन!"

माझ्या डोक्यावर वज्राघात झाला!

तो फोटो मीच काढला होता.

जामखेडाहून फोटोसाठी आलेलें ते रत्न मला ठाऊक होते.

कपाळावर हात आपटीत मी ताडकन् उठलों.

# जग हें असें आहे : : : ४

पुण्यालगतच एरडवणें म्हणून गाव आहे, तिथेच जिवबाची झोपडी होती. शहरात सर्व सुखसोयींनीं परिपूर्ण अशा ऐसपैस जागा पहाण्यास चटावलेल्या डोळयाना ती झोपडी अगदीच भिकार वाटली असती.

झोंपडी अगदी किरकोळ असून तिनें व्यापलेली जागाही लहान होती. निव्वळ ऊन थडी व पावसापासून आडोसा होता ती झोंपडी म्हणजे. जरा मोठा वारा आला तरीही तिच्या दुरुस्तीची आवश्यकता उत्पन्न होई.

तीत म्हातारा जिवबा, त्याची वयस्कर झालेली बायको निळी व पाच वर्षांचा मुलगा दिघू एवढें कुटुंब रहात होतें. झोंपडी लहान असली तरी जिवबाच्या पणजोबा आजोबा पासूनची होती. जिवबाची एवढीच काय ती मालकीची जागा पृथ्वीच्या पाठीवर.

मीठ भाकरीसारखे साधेंसुधें अन्नही दोन वेळेला धडपणें भेटत नाहीं अशी गरीबांची स्थिति. असल्या कंगालांच्या संसारांत दुःखाची केव्हांच कमतरता नसते. गरीबीबरोबर तीं पाठराखणी म्हणून येतातच.

जिवबाच्या प्रपचाचेंही असेच होते.

*   *   *

म्हातारा जिवबा आज लहानपणापासून त्या झोपडीत राहिला होता. पोरवयापासून त्याचा कष्टातच जन्म गेला. आता सुद्धा जिवबा व निळी हे दिघूचे चाळीशीच्या बाहेर गेलेले आईबाप रोज श्रम वेचून मेहेनताना मिळवून आणीत. जिवबाचा ससार हातावर होता. त्याची व निळीची एका दिवशींची कमाई दुसऱ्या दिवसापर्यंत कधीच टिकली नाहीं.

रोज दिवस जरा वर आला कीं जिवबा व निळी दिघूला घेऊन घराबाहेर पडत. त्याच्या झोपडीसमोरच मळाई नावाच्या देवीचें कडक दैवत होते, देवीला भक्तिभावाने नमन करून आसपासच्या शेतात मोलमजुरी करण्यास दोघेही जात.

जिवबा व त्याची निळी याच्या प्राण—ग्याऱ्या दोन गोष्टी होत्या. एक म्हणजे मळाई देवी. हें त्याचे कुलदैवत होते. या दैवतावर त्याचा अतोनात विश्वास होता. तसे पाहिले तर त्यानीं देवीकरता दमडीहि खर्चिली नव्हती. पण तिच्यावर त्याची बिनमोल श्रद्धा होती. मळाईनेही आपल्या अतरींचा भक्तिभाव जाणला आहे असा त्याचा दृढ विश्वास होता. कारण त्याना मळाईच्या प्रसादाने मुलगा झाला होता. तोच दिघु.

या मुलासाठीं मळाईला कितीकदा तरी त्यानीं सकटीं घातले असेल. अखेरीस जिवबा—निळीच्या हौसेची परिपूर्णता झाली, व जिवबाच्या झोपडींत मूल रागू खेळू लागलें.

सहजच देवीच्या खालोखालची त्याची आवडती वस्तु दिघु ही होती व त्या सोनुकल्याच्या जिवाकडे पाहून ससारात हरघडी येणाऱ्या आपत्ति विपत्तींची त्यांनीं कधींच कदर केली नाहीं.

अलीकडे दिघूचे आईबाप थकत चालले होते व वयोमानाने जिवबा व निळीच्या शक्तींत बदल झाला होता. तारुण्यातील नवा दम आता राहिला नव्हता. तरीही दिघूकडे बघून दोघे उल्हासानें काम करीत. परंतु मधें दुखणें आलें तर तो दिवस कामावांचून कढणें भाग होतें. अशा वेळीं

कोणी तरी एकजण कष्ट करी व निम्या शिम्या मिळकतीवरच त्याना गुजारा करावा लागे.

अशा रीतीनें जिवबाचा प्रपच चालला होता.

* * *

आणि याच दिवसात एरडवणे गावाजवळ मोठ्या घडामोडी चालल्या होत्या. शिक्षणाच्या सुलभतेमुळे पुण्याची वस्ती हळूहळू वाढू लागली. उत्तम व मध्यम वर्गांतले लोक हजाराने पुण्यात राहूं लागले. जे मध्यम परिस्थितींत होते ते भाड्याने रहात व जे धनाढ्य होते त्यानीं बगले बाधण्यास सुरवात केली.

पुण्याची हद्द कालमानाबरोबर वाढू लागली. आजूबाजूला ज्या काळ्या जमिनींतून शेतकरी उदरनिर्वाह करीत होते, तेथे बगले थाटले जाऊ लागले. शेतकऱ्याना पैशाच्या मधाचे बोट लावल्यामुळे त्यानी ताबडतोब आपल्या जमिनी पैसेवाल्याच्या हवालीं केल्या.

हळू हळू आसपासचीं गावेही पुण्यात सामील करण्यात आलीं. येरडवणें हे त्यापैकीच एक होते.

जिवबाच्या झोपडीला खेटून धनिकाचा बगला आला.

* * *

त्रिंबकशेटनी स्वत:चा बगला फार हौसेनें बाधला होता, व तसे करताना पैशाकडे पाहिले नाही.

पहिल्यानें घेतलेली जागा त्याना मोठी वाटली. पण जशी इमारत बाधली तशी ती तोकडी भासू लागली. त्याना बगल्यानजीकच एक बाग करावयाची होती पण तसें करायला जागेची सवड नव्हती. बरे, आसपासच्या जागा सगळयानीं खरेदी घेतल्या होत्या. फक्त त्याच्या लगतच्या जमिनीपैकीं जिवबाची झोपडीच मिळण्यासारखी आहे असें त्याना वाटलें.

त्रिंबकशेटनीं जिवबाला शब्द टाकून पाहिला. पण जिवबाकडून त्याना नकार मिळाला.

जिवबानें स्वाभिमानपूर्वक उत्तर दिलें "शेट, माझ्या सत्तेचा असा एवढाच कोरभर तुकडा आहे. इथेंच मी माझ्या मायेचा माणसाच्या

अगाखाद्यावर बागडलों व येथेच माझा दिघू आपल्या म्हातारा म्हातारीच्या भोंवतीं भोंवती असतो. शेट, आपुलकीची भावना हा काही और पदार्थ आहे. श्रीमताच्या राजवाड्यानाहीं तो बेपत्ता असेल. पण आम्हा गरीबाला आपुलकी फार. आम्ही जगतोच मुळी आपुलकीच्या भावनेवर. पैशाच्या रुमझुमीलाहि ती दाद देत नाहीं."

पण जिवबाचें पुराण ऐकण्यास त्रिंबकशेटना वेळ नव्हता. कितीहि पैसे दिले तरी जिवबा सौदा कबूल करीत नाहीं हा मुद्दा त्यानीं जाणला. जिवबाकडे एक तिरस्कारयुक्त अशी नजर त्यानीं फेकली व ते निघून गेले.

जिथे जावे तिथे मानमरातबात रहावे हा त्रिंबकशेटचा शिरस्ता होता. त्याना जिवबाच्या नकारानें खाली पडलेला शब्द कसा पाहवणार! आसपासचे सारे लोक त्याचाच मान राखीत. या अपमानाचें उट्टें काढण्याचा त्यानीं तेव्हाच निश्चय केला.

एक दिवस सकाळचेच जिवबा व निळी कामाला जाण्याच्या गडबडींत होतीं. अलीकडे येरडवण्याजवळच असलेल्या दगडाच्या खाणीवर दोघेंहि कामाला जात असत. नुकताच निजून उठलेला दिघू झोपडीबाहेर खेळत होता.

त्यानें त्रिंबकशेटच्या बगल्याच्या कुपणाबाहेर डोकवत असलेलीं तीन रसरशीत गुलाबाचीं फुले बघितलीं. तीं घेण्यासाठीं तो धावला.

दिघू तळहातावरच्या फोडाप्रमाणें आज पाच वर्षे सगोपला गेला होता. जगाच्या अनुभवाच्या दालनात त्याचा अजून प्रवेश नव्हता. त्याच्या दृष्टीनें तीं अद्याप कडी-कुलपात होतीं. आपले व लोकाचें यातील भेदभाव त्यास याकाळ पावेतों उमजला नव्हता म्हणूनच त्यानें ज्या क्षणाला तीन ताजे तवाने गुलाबगेंद पाहिले त्याच निमिषाला त्यास ते हवेसे वाटले व तुरु तुरु कुपणानजीक जाऊन त्यानें तिन्ही सौंदर्यानें मुसमुसलेलीं गुलाबाचीं फुलें खुडलीं. त्रिंबकशेठ जवळच असून ते हें सर्व निरखीत होते. पण निरागस दिघूला त्याचें काहींच वाटले नाहीं.

त्रिंबकशेठनीं दिघूचा हात पकडला. 'तुझ्या बापाचीं झाडें होतीं का हीं? तरी म्हटलें रोज फुलें कोण नेतें? रोज मी आपला झोंपेच्या आधीन.

आज मुद्दाम लौकर उठलो. एवढ्या वयापासून असले उद्योग!' अशी गर्जना करीत त्यानीं दिघूच्या खाडकन् दोन थोबाडींत लगावल्या.

दुसरा एकादा मुलगा असता तर त्याची त्रिंबकशेटनीं कदाचित् गयही केली असती, पण जिवबाचा मुलगा दिघू यास त्याच्याकडून क्षमा होणें शक्यच नव्हते. उलट त्याला शिक्षा करताना त्याचे सर्व अवसान जणू एकवटले होते.

परतु त्या कोवळ्या बालकावर याचा फार परिणाम झाला. तो मोठ्यानें किंचाळला व मूर्च्छा येऊन पडला. गुलाबाची फुलें त्याच्या हातात तशीच होतीं.

किंकाळीसरशी जिवबा व निळी झोपडीबाहेर आलीं. त्याना पाहिल्या-वर त्रिंबकशेटना जास्तीच चेव आला. त्यानीं दिघूच्या हातातील चुरगळ-लेलीं गुलाबाचीं फुले हिसकली व लाबवर भिरकावून दिली.

निळी व जिवबा दोघानाहि कामधाम सुचलें नाहीं. त्याची तहानभूक हरपलेली होती. जड अत:करणाने व ओल्याचिंब डोळयानीं दिघूची सेवा त्यानीं चालवली होती.

दिघू थोडयाच वेळाने शुद्धीवर आला. पण लगेच त्याला वात झाला. त्या स्थितीत त्याची बेसुमार बडबड चालली होती 'आला...तो पाढऱ्या सफेत कपडयाचा इसम...गुलाबाचीं फुलें...अयाई, आई सारेच बगले-वाले असे निष्ठुर असतात का ग?' असेच काहींतरी तो म्हणत होता.

जराशानें निळीनें जिवबाला मळाईचा प्रसाद व अगारा आणायला सागितले. मुडासे न चढवताच जिवबा झोपडीबाहेर पडला.

* * *

" पुजारीबुवा, थोडा प्रसाद व अगारा मिळेल का?"

देवीजवळील पुजाऱ्यानें वर मान केली. जिवबा बघताच त्याच्या कपा-ळाला आठ्या पडल्या. त्रिंबकशेटची व जिवबाची तेढ आहे हें त्यास माहीत होतें.

'कशाला पाहिजे?' त्यानें विचारलें.

'माझें पोर तापलें.. आहे. भ्रमल्यासारखे करीत आहे, तेव्हा मळाईचा प्रसाद व अगारा...'

"दोन्हीहि मिळणार नाहीं. येथील सर्व प्रसाद त्रिंबकशेटकडे जातो. शिवाय अगारा कालच सपला. पण कायरे, पोर आजारी आहे तर औषध दे, नुसत्या नैवेद्यानें व अगाऱ्यानें काय होणार! परवा त्रिंबकशेटच्या मुलाला थोडी कसर आली; तेव्हा दहा डॉक्टर त्याच्या उशा पायथ्याला होते. डॉक्टर आणल्याशिवाय व्यर्थ आहे."

जिवबा खिन्न चित्ताने देवळातून बाहेर पडला. त्याच्या डोक्यात कसले तरी विचार घोळत होते. तो पुटपुटला 'देऊळ त्रिंबकशेटच्या हुकुमती खालीं असल्यासारखे आहे. अगारा देखील मिळायला फार खटपट करावी लागेल. शिवाय औषधपाण्याचा उपयोग करून पाहिलाच पाहिजे."

त्याचा काहीं तरी विचार ठरला. तो त्रिंबकशेटच्या फाटकाजवळ आला. कातर मनानें त्याने फाटकाचें दार उघडले.

त्रिंबकशेट बाहेरच्याच ओट्यावर आरामखुर्ची टाकून चिरूट फुकीत पडले होते. त्याच्या माडीवर कसले तरी इंग्रजी वर्तमानपत्र होते.

'शेठ' जिवबाने हळूच हाक मारली. 'कोण जिवबा, काय काम आहे?' त्रिंबकशेठनी किंचित् बेपर्वाईच्या स्वराने विचारले. 'मला माझी जागा विकायची आहे. घ्याल ती विकत?'

'मागे सौदा करायला आलों तर मला आपुलकीच्या बाता मारीत होतास नाहीं का? त्यावेळीं मी गरजू होतों, आठशे रुपयापर्यंत किंमत देत होतों. आता तुला जरूरी आहे. सहाशे रुपये मोजतों. बघ पटत असेल तर नाहींपेक्षा रस्ता पकड.'

'द्या, शेठसाहेब, मर्जीला येईल ते हातावर ठेवा, पण लौकर आणा पैसे.'

त्रिंबकशेठनीं माडीवर जाऊन सहाशें रुपयाच्या नोटा आणल्या. लगेच मोटार सिद्ध ठेवून खरेदीखतही करून घेतले व जिवबा सहाशें रुपयासकट त्रिंबकशेटाच्या मोटारमधून उतरला. तो जात असतां शेठ म्हणाले होते, 'मला उद्या सकाळपोंतर जागा खाली पाहिजे. बागेसाठीं आजच मी फूल-झाडांचीं रोपटीं आणवतों.'

* * *

जिवबाने लगेच एक बैलगाडी ठरवून आपल्या झोंपडीपुढें आणून उभी केली.

निळी वाटच पहात होती त्याची. ती किंचित् काळ झोंपडीबाहेर डोकावे व पुन्हा दिघूचें माडीवरून खालीं ठेवलेलें डोकें पूर्ववत् अकाशीं घेई, मधून मधून सारखी दिघूच्या अगाला हात लावून ती तापाचा चढ-उतारही पाहात होती.

इतक्यात जिवबा आत आलेला तिने देखला, 'आणलात अगारा... देवीचा प्रसाद ..?'

'प्रसाद ! अगारा !! निळे ! मळाईने आपल्यावर अवकृपा केली आहे, देवी श्रीमताची धार्जिणी बनली आहे. आपल्यासारख्या मजुरांच्या आयुष्याचा अगारा करण्याचे तिच्या मनात आहे. आपल्या सर्वांचाच नैवेद्य ती मागत आहे.

'काळ फिरला तसा परमेश्वर पालटला...जाऊ दे ! चल निळे; बाळाला दवा पाणी करू, बाहेर गाडी उभी आहे. हा गाव सोडून जाऊ.' जिवबाच्या डोळ्यातून टप् टप् आंसवे गळत होतीं. त्याने सर्व काहीं निळीला सागितले.

जिवबाने मुडासे घातले. निळी निघण्याच्या तयारीला लागली.

गरिबाचा प्रपच बैलगाडींत भरला गेला. गाडींतच एका फाटक्या घोगडीवर दिघूला निजवण्यात आले.

जिवबा व निळी त्याच्या डाव्या उजव्या कुशीस बसलीं.

'कुठे जायचे ?' गाडीवानाने पृच्छा केली.

'कोणतें मकाण गाठायचे म्हणून विचारलेंस ? जायचें कुठें ? जिथे आपलेपणा नादत असेल त्या राज्यात.. जिथें दुज्या भावाचा लोप झाला असेल त्या ठिकाणी.. जेथे गरीब व श्रीमंत हीं समाजाचीं वाटोळें करणारीं सापाचीं वेटोळीं नसतील तिथे. एकमेकाविषयीं जिथ सहानुभूति असेल तिथे.' जिवबा एकटा आपल्याशींच पुटपुटत होता. जरा वेळानें, त्याने आजूबाजूस नजर दिली. मग तो भानावर आला व गाडीवानास म्हणाला, 'हें बघ, माझें अजून कांहींच नक्की नाहीं. पण आधीं तूं या

एरडवण्यापार आम्हाला घेऊन चल. तोंपर्यंत कुठ जायच हें तुला सांगेन. पैशाकरितां विचारत असलास तर मुळींदेखील काळजी करू नकोस. तुला मी नाखूष होऊं देणार नाहीं. ही खात्री बाळग.'

जिवबाने आपल्या कमरेचा कसा खोलला व त्यातील नोटा गाडी-वानास दाखवल्या.

* * *

बैलगाडी धीमेधीमे चालू लागली.

## मथू : : : ५

सात वर्षांची इवलीशी पोर ! ती करवदे तोडण्यात सराईत दिसली. आता दोन-तीन नजीकच्या करवदीच्या जाळ्या ती हिंडली, पण टपोरीं फळे अलगद काढून तोडात टाकताना एक देखील काट्याचा ओझरता ओरखडा तिनें अनुभवला नाहीं.

सूर्य वर तळपत होता. शरीरातून थेंब निथळत होते. परन्तु मथूचा आपला करवदे चापण्याचा सपाटा चालला होता.

काय करील ती ? सकाळपासून घरात चूल पेटली नाहीं, अजमासें दहा वाजेपर्यंत ती स्वैपाकघरात घोंटाळली, आईजवळ तीनतीनदा खायला मागितले तिनें.

आईचें आपलें मथूला एकच उतर.

‘ कोण तो गोविंदा शिपाई नुकताच इथें आला आहे कामाला, सर-कारी पासावाचून लाकूडफाटा उचलू नका असे बजावतो; दोन-चार जणाना

पकडून तो कोठेसे घेऊन गेला म्हणे; आम्ही गोरगरिबानीं पोटात काटेकुटे भरून जगलच्या वस्तीला राह्यचे. कुठला आणायचा पैसा सरकारी परवाना काढायला? काही थोडया दमडयादुगाण्या हातीं येतात, त्या दाणे घेण्यातच खर्ची पडतात. या गोविदाच्या आधींचा बाबा किती चागला होता, मधून मधून जेवायला यायचा, म्हणायचा 'घेऊन जा सरपण बिनदिक्कत; काहीं एवढयातेवढयाने सरकारला उणें पडत नाही, झाडाच्या खाद्या तोडल्या, तर त्या दुप्पट जोमाने उगवतात.' पण तो शिपाई पेन्शनींत गेला. आजपोतर रानाला पुष्कळ नोकर आले! या गोविदा पोलीसाची तऱ्हा काहीं न्यारीच! मथू, चुलीत जाळायचे काय! आजवर साठवलेले किडुकमिडुक हा बदलीचा आला तेव्हापासून वापरले.. काडीदेखील या घटकेला नाही, बरे, तोडायला जावे, तर गोविदाचा मुक्काम नजीकच आहे. विचारायला गेले आहेत त्याला, पाहू काय जबाब येतो तो...'

जरा वेळाने गोविदा शिपायाकडे गेलेला मथूचा बाप परत आला. मागील नोकर किती दयाळूपणें वागत असे ते त्याने गोविदाला सागितले. सरतेशेवटीं काही फळे, शिकार वगैरेसारख्या जिनसाच्या मोबदल्यात लाकूड घेऊ देण्याची बातहि त्याने गोविदापाशी केली. पण सरपण नेण्याची परवानगी त्याला मिळाली नाही.

गोविदा हा फॉरेस्टकडे लागल्याला फार दिवस झाले नव्हते. तो निधडया छातीचा व काहीमा दयार्द्र अतःकरणाचा होता. लागलेली नोकरी नेकीने केली तर टिकेल अशी त्याची समजूत होती. सरकारी चाकरी म्हणजे त्याला मोठी मानाची व अधिकाराची बाब वाटत असे, व आतापर्यत जगलातल्या पाचसहा चोऱ्या पकडून त्याने रेजरसाहेबापुढे हजर केल्या होत्या. रेजरनेच ते आरोपी पुढें सोडून दिले, याला गोविदाचा इलाज नव्हता.

रानात सदोदित रहाणारी कुटुबे पैशाच्या किती अडचणीत असतात याची त्याला अद्याप उमग नव्हती. याचे कारण गोविदाला महिन्याच्या महिन्याला पगाराचे बारा रुपये लाभत हेच बहुधा असावे! गोविदाच्या अगोदरचा शिपाई पूर्ण अनुभवी होता. आपणासही रानातून वेळी-अवेळीं हिंडावें लागते, कधीं भूक लागली, तर जवळच्या झोपडया आपल्या लोभात असा-

यला हव्यात, हें तो जाणत होता. तेव्हा याना एखादद्‌सरा बाभळीचा ओंडका घेऊ दिला, तर सबंध जंगल काहीं तुटत नाही, बरें, तसें करण्याची सवलत नाकारली, तरीही एवढ्या मोठ्या रानात चोरूनमारून लाकूड पळवले तर ध्यानात यायला मार्ग नव्हता. तेव्हा या गरीब रानवटाना विश्वासात ठेवण्यासाठीं तो शक्य तितका दक्ष असे.

मथूचे आईबाप त्या जंगली प्रदेशातलेच रहिवासी. झाडावरच्या मोहोळातील मध काढून विकणे, वाघाची कातडी देऊन रक्कम घेणे, कोणी रानातील झाडे लिलावाने खरेदी केली तर त्याला झाडे तोडण्यास मदत करणे या कामावर त्याचा प्रपंच चालला होता. जवळपास जी शेती होती, तेथील धान्यधुन्य त्याना विकत मिळे. केव्हा सणावारी तेल, मीठ, मिरची लागे, तितक्याचपुरते काय ते त्याना एखादे खेडेगाव पाहावे लागे. त्याचा संसार भरज्वानीत होता, मथू ही त्याची एकुलती एक मुलगी. रोख नाण्याखेरीज कसलीही त्याच्या झोपडींत कमतरता नव्हती.

आज लाकडे नाहीत एवढ्यासाठी चूल बंद हा आईच्या भाषणाचा इत्यर्थ मथूने मनात धरला व बाप खिन्न चेहऱ्याने घरी आल्यानंतर ती झोपडीबाहेर पडली.

तिने खूपशी करवदे खाल्ली. याच वेळी भयंकर वारा सुटला, जवळच्या एका वृक्षाची फांदी मोडून खाली आली. मथूचे तिकडे लक्ष गेले.

ती धावतच फांदीजवळ उभी राहिली व होते–नव्हते तेवढे बळ एकवटून मथूने ती फरफटत घाईने घराकडे चालविली.

आई–बापाना केव्हा एकदा आपला पराक्रम दाखवू असे तिला झाले होते.

“आता स्वयंपाक व्हायला आडकाठी नाही” असे ती मनाशीं म्हणत होती.

पण इतक्यात आसपास टेहळणीवरच असलेल्या गोविंदानें तिला मुद्देमालानिशीं पकडले.

‘काय ग पोरी, कुणीकडे चालवलीस फांदी?’

‘घरीं’ मथू म्हणाली.

‘परवाना आहे का?’

‘कसला? आम्हाला अन्न शिजवायला सरपण पाहिजे आहे...’

‘तुला मी सरकारी कायद्यान अटकाव करतो.’

‘कुठला कायदा? देवान झाड निर्माण केली... माणसाला जेवण तयार करण्यास विस्तव लागतो...’

‘फार चुरुचुरु बोलतेस, कोणच्या दिशेला राहतेस? चल ती फादी घेऊन.’

मथू घरापाशी आली. तिने बापाला हाक मारली.

किंचित् काळापूर्वी आपल्याकडे येऊन गेलेला इसम हाच त्या मुलीचा पिता आहे हें पाहताच गोविंदाने त्याचाच वहीम घेतला व तो म्हणाला, ‘काय राव, तुम्हाला मघाशीं घसा फोडून सागितल तरी चिमुरड्या पोरीकरवीं गुन्हा केलात होय? अशान माझ्याकडून गय होईल अस वाटत तुम्हाला! चला आता सर्वच रेंजरच्या ऑफिसात, तुमच्यावर खटला गुदरतो. चागला दड द्यावा लागला कीं वठणीला याल.’

मध्यतरीं मथूची आईही तेथे ठाकली होती. तिने व तिच्या नवऱ्यानें गोविदाची पुष्कळ समजूत पाडण्याचा यत्न केला, तथापि काहीं उपयोग झाला नाहीं.

गोविदा मथूला व तिच्या आईबापाना घेऊन जगलापासून बऱ्याच दूरवर असलेल्या रेंजरच्या कचेरींत गेला.

जाताना मथूचा बाप मागे जे गोविदाने अटक केलेले लोक रेंजरने सोडून दिले, त्याना भेटला होता व म्हणूनच त्याने बरोबर दोन मघाच्या बाटल्या व एक वाघाचे कातडे गुप्त रीतीने घेतले होते.

ही सामुग्री ऐन वेळी गरजेला आली. रेंजरसाहेबाना एकीकडे गाठून या वस्तु देण्यात आल्यानतर व त्याना एक फोडीव लाकडाची गाडी बगल्याशीं आणून टाकण्याचे आश्वासन मिळाल्यावर रेंजरने सगळ्याना मोकळें केलें आणि एका लहान मुलीचा किरकोळ अपराध नसत्या महत्त्वाला चढविल्याबद्दल गोविदाला तबी बसली.

तेव्हापासून मथू राजरोस सर्पण नेऊ लागली.

मथूच्या मातापितराचा फॉरेस्ट रेंजरशी संबंध आल्यानंतर एक महत्त्वाची घटना घडली.

या ऑफिसरला शिकारीचा नाद होता. सर्व जन्म जंगलांत राहिल्याकारणानें मथूच्या पित्याला हिंस्र पशूच्या खाणाखुणा, त्यांच्या विश्रांतीच्या वेळा व जागा ठाऊक होत्या. याचा रेंजरनें आपल्या आगामी एक-दोन शिकारीत भरपूर फायदा करून घेतला.

पण असल्या घालमेलींतच मथूच्या आईबापाचा अंत ओढवला.

एकदा रेंजर, त्याच्या वरच्या हुद्याचे दोन युरोपियन साहेब बरोबर घेऊन रानात वाघ मारण्यासाठीं आला. एक वाघीण दृष्टिपथात आल्यावर तिचा पाठलाग सुरू झाला.

नंतर बराच वेळ कितीही शोधले तरी वाघीण नजरेतच येईना.

रेंजरने मथूच्या बापाचा सल्ला घेतला.

गोविंदाला सोबतीला देऊन त्याला वाघिणीच्या मार्गावर रवाना करण्यात आले.

याच समयाला नवऱ्याला शिदोरी घेऊन कॅम्पवर निघालेल्या मथूच्या आईने लांबवर नवऱ्याला बघितले. तो हाकेच्या टप्प्याच्या पलीकडे असल्यामुळे ती झरझर त्याच्याकडे जाऊं लागली.

आणि त्याला आरोळी ऐकू जाईल असे वाटताच तिनें हाक ठोकली.

त्या क्षणीं जवळच्या झाडींत दबा धरून बसलेल्या वाघिणीने तिजवर झडप घातली!

मथूचा बाप व गोविंदा शिपाई यांनी ते पाहिले.

हातातील कुऱ्हाडीनिशी पत्नीला वाचवण्याकरिता आलेला मथूचा जन्मदाताही बायकोला वाचविताना मृत्युमुखी पडला व गोविंदाचा डाव्या हाताचा पंजा वाघिणीने ओरबडला; परंतु लगेच वाघीण गडबडा लोळूं लागली. मथूच्या बापाने मरतेवेळी केलेल्या कुऱ्हाडीच्या फटकाऱ्यांचा हा परिणाम होता. नंतर तिला ठार मारण्याचे काम गोविंदानें तडीला नेलें.

जमिनीवर अस्ताव्यस्त पसरलेल्या वाघिणीसमवेत युरोपियन अधिकारी,

रेंजर व मागल्या बाजूला गोविंदा असा फोटो काढण्यात आला. मेलेल्या माणसाची हळहळण्याव्यतिरिक्त विशेष चौकशी झाली नाही !

गोविंदाच्या डाव्या हाताचा पंजा इतका दुखावला गेला कीं, तो शस्त्र-क्रियेने शरीरावेगळा करणें प्राप्त ठरले. त्याची नोकरी याच गोऱ्या साहेबानीं कायमची केली. आईबापाची निधनवार्ता कानीं येताच मथू शोकाने बेहोष झाली. गोविंदा तिला स्वत:च्याजवळ संभाळणार होता. तो मथूला तसे म्हणालाहि. तथापि मथूला आता फिरं रानाची धडकी बसली. आपल्या माता-पितरासारख्या देवमाणसांना खाणारे हे जंगल व्याघ्ररूपी राक्षसानीं व्यापले आहे अशी तिच्या बालबुद्धीची ठाम कल्पना झाली व तिने मनुष्यवस्तींत जाण्याचे ठरविले.

झोंपडींतील टोपली तिने घेतली, रानफळानी ती भरगच्च भरली व ती विकण्यासाठीं म्हणून मथू रानाबाहेर पडली.

मार्गात वाटसरानीं तिचा माल खरेदी केला.

जे पैसे आले, त्याचे रस्त्यावरच्या दुकानात मथूने डाळ–चुरमुरे घेतले व ती पुढे चालू लागली.

एका खेडेगावात मथू आली.

तेथे कोणीदेखील तिला कामधंदा दिला नाही, किंवा सहानुभूतीचे शब्द तिच्याशीं बोलले नाहीं. मग ती वेशीपार झाली व दुसऱ्या गावीं गेली.

तेथेही थोडयाफार अशीं हाच प्रकार घडला.

पुढच्या खेडयातही तशीच वर्तणूक...

ती अतिशय चालली. दोन–चार खेडीं टाकून तिने शहरातप्रवेश केला.

एकसुद्धा मनुष्य तिचे दु:ख तत्परतेनें ऐकत नव्हता. काहीं तिच्याच जातीच्या वाडयातून तिला हाकलून देण्यात आले.

काहीं हिंदूच्या दारीं तिला अन्न मिळाले; पण तें असें कीं खाल्ल्याबरोबर मथू भडभडा ओकलीच.

ठिकठिकाणच्या गावातून यापूर्वी असेच आबोण ती गिळीत आली होती.

यामुळें असें झालें कीं, प्रकृतीनें तिचा ठाव सोडला. मथू एके दिवशीं भीक मागत असता भोंवळ येऊन रस्त्यावर पडली.

तिच्याभोंवतीं तमासगीर जमले. अखेर खिस्ती मिशनचा दवाखाना होता, त्याचे फिरते साथीदार तेथें आले व मथूला घेऊन गेले.

ती शुद्धीवर आल्यानतर एका म्हाताऱ्या दाढीवाल्यानें एका ताटलींत तिच्यापुढें जेवण ठेवले व तो म्हणाला, "बाळ, हें खा. आमच्याजवळ रहा. आजपासून तू आमची झालीस." मथू एवढीगी खरी, पण चाणाक्ष होती, व तडफदारही होती. ती ताड्कन् उठली व म्हणाली, 'मला बाट-वता होय? तशाने अन्न मिळाले, तरी त्याचा मला तिटकारा आहे. मी जेवणासाठी बाटणार नाहीं. .' असे बडबडतच ती दवाखान्यापार गेली.

आपल्या जातीच्या लोकाचा पुन्हा उबरा ओलाडायचा नाहीं असा मथूचा निश्चय केव्हाच झाला होता.

किंचित् काळ शहरगावी वास्तव्य करून तिला हिंदूच्या खेरीज इतर धर्मांची ओझरती जाणीव आलेली होती.

खिश्चन धर्माचा थोडाफार परिचय खिस्ती मिशनच्या औषधालयात घेऊन ती मुसलमानी मोहल्यात नोकरीसाठी भटकू लागली.

इथे तर तिला मारून रस्त्यावर काढण्यात आले. मथूला काहीं काहीं शब्दाचे अर्थ नीटसे कळत नव्हते. प्रत्येक घरात 'काफर' ही तिला न समजणारी पदवी मथूस देण्यात येई, तेव्हा ही शिवी असावी असा तिने तर्क बाधला.

शहराबाहेर काहीं बगले होते, तिकडे ती भीक मागू लागली.

एका भव्य इमारतीच्या कुपणाशी जाऊन मथूने तारस्वरात याचना केली.

'कुठली ग पोर तू?' तिथल्या पारशी मालकिणीने फाटकानजीक येऊन विचारले.

'आहें अशीच, आज महिनाभर वणवण भटकतें आहें; खायला दाणा नाहीं. माणसें बालडीभर खरकटें उकिरड्यावर टाकतात, पण भिक्षा म्हणून चतकोर तुकडाही कोणी फेकत नाहीं. दिलेच तर, बुरा आलेली भाकरी, माशा पडलेली कढी...'

'आणि तुझे कपडे किती ग फाटले आहेत. ये बघू आत...'

त्या पारशिणीनें मथूला बगल्यांत नेलें.

गड्याला पाणी तापवण्यास फर्मावून अग धुण्याची सिद्धता होईपावेतों तिने मथूला काही प्रश्न विचारले.

मथू तोंडाला येईल ती उत्तरें देत होती.

नतर तिला सर्वांग स्वच्छ करण्यास त्या बाईने सागितले.

मथूच्या फाटक्या लक्तऱ्या तिने फेकून दिल्या व तिला एक पारशी पद्धतीचा फ्रॉक तिने घालण्यास दिला.

तिला आरशासमोर नेऊन तिचे केस सुवासिक तेल लावून हस्तिदती फणीनें व्यवस्थित करण्यात आले.

स्वतःचे प्रतिबिब पाहण्याचा हा तिचा प्रथमचाच प्रसग. नीटनेटक्या शारीरिक बाध्यामुळे मथू किती पण सुदर दिसत होती !

त्यातच चेहऱ्यावर स्नो पावडर फासली गेली, तेव्हा तिच्या मुखमड-लाला एक तऱ्हेचा तजेला प्राप्त झाला.

मथूने पाच–सहा कप चहा घेतला, पाव खाल्ला व त्या पारशिणीचे धन्यवाद गात तिने दिलेल्या फॅशनेबल वहाणा घालून मथू निघाली.

जाताना त्या दयाळू बाईने तीन रुपये दिले. परतु ही बिदागी किती काळ पुरणार ? चार दिवस जणू काय तिच्या पायाला भोवरा बाधला होता ! या गावाहून त्या गावाला जा असे सारखे मथूचे चालले होते.

अजून एकदा भिक्षा मागणे आले.

हिदु गल्लीचा तिला तिरस्कार वाटत होता, मुसलमान व खिस्ती देखील तिला नकोसे झाले होते.

एक म्हातारा पारशी वाटेने चालला होता, त्याजजवळ तिने पोटासाठी विनवणी भाकली.

" ऑ, ही मुलगी पारशी, माझ्या धर्मातली, माझ्या जातीची अन् चार इसमादेखत पदर पसरते '.. .. ! " असे मनाशी उद्‌गारत त्या पारशी गृहस्थानें मथूला आपल्या निवासस्थानीं नेले.

नतर त्याने मथूला विचारले, ' तू कोण आहेस ?'

तिला हिदु म्हणवून घेणें आवडत नव्हते; मी इस्लामी धर्माची आहें असें सागणें तिला अभिमानास्पद वाटले नाहीं. ती झटकन् बोलली ' मी

तुमच्याच जातीची. तुमच्याचसारखे प्रेमळ बुद्धीचे माझे आईबाप होते, त्याचें छत्र गेलें, पैसा नाहीं. मी तापल्या उन्हातून वणवण सैरभैर फिरू लागलें...भिक्षापात्र पुढें केले......!'

'बोल् नकोस' तो वृद्ध पारशी एकदम म्हणाला. 'तुला खायला मिळालें नाही, तर उद्या तू खिस्ती होशील, मुसलमान बनशील, हिंदु धर्मात जाशील.'

'नाही, खिस्ती धर्म मला नको, इतराचें तर माझ्यापुढें नावच काढू नका.... '

'अहाहा, आहे, झरतुष्ट्राची कृपा आहे तुझ्यावर. आपला धर्मच असा आहे. आपल्यातील एकही परक्या जातीचा होत नाहीं व आपणही कुणा-लाहि आपल्या धर्मात घेत नाही, बाळ, ये माझ्या सगतीनें, गुजराती तुला येत नाहींसे दिसते. मराठीही शुद्ध बोलत नाहीस...'

मथू जगलातील राहणारी. तिचे मराठी उच्चार ओबडधोबड असणें अगदी साहजिक होते.

ती मुकाट्याने पारशाच्या मागोमाग गेली

म्हाताऱ्या पारशाने तिला गरम गरम चहा दिला, पाव खाऊ घातला व नतर आपल्या खास चिठीनिशी मथूला, अनाथ पारशासाठीं मुबईला जें बोर्डिंग होते, तेथे त्याने पोचवण्याची व्यवस्था केली.

साप्रत मथूला कसली उणीव नव्हती. सगळेच स्निग्ध वातावरण; हसरे सवगडी, चागले शिक्षण, नियमित आहार...सर्वच तिचे यथास्थित होऊ लागले.

प्रारभीं तिला गुजराती मुळी येतच नव्हते. पण हलके हलके या बोलींत ती बरीच वाकबगार होत चालली.

तरुणपणीं मथू फारच देखणी दिसत होती. एक पारशी नावही तिनें बोर्डिंगात पाऊल टाकते वेळीं धारण केले होते. हें तिचें अभिधान अंतः-करणात घोळवीत, ती नजरेस पडावी अशा इराद्याने कित्येक पारशी तरुण बोर्डिंगच्या दारापाशी हेलपाटे घालीत असत.

यापैकीं चारपाच युवकाशीं तर मथूची ओळखही झाली व त्यातीलच

एका कर्तबगार जवानाला तिनें स्वतःचा सहचर निवडलें.

आणि अशा प्रकारे इंग्रजी तीन इयत्ता शिकून शाळा सोडलेल्या मथूचा एका सुखवस्तु पारशी कुटुंबाशीं संबंध आला व मथू ही मिसेस माथेरानवाला बनली.

एकदा ती पतिसमवेत मोटरींतून फिरत असता सहजासहजी एका देवळावरून त्याची टूरिंगकार जात होती.

देवळाच्या दरवाजापासून भिकाऱ्याची रांग लागली होती. त्यातल्या एका थोट्या माणसाकडे मिसेस् माथेरानवालाचें सहजगत्या लक्ष गेले. लगेच तिने मोटर थांबविण्यास शोफरला सांगितले व मनीबॅगसह मिसेस् माथेरानवाला खालीं उतरली. तिचा नवराहि विस्मयातिरेकाने तिचे कृत्य मोटरमधूनच पाहत राहिला.

'कोण गोविंदा ?' त्या थोट्या इसमासमीप जाऊन मिसेस् माथेरानवाला उद्गारली, 'आणि तू इथ कसा ? भिकारी '

एवढा उंच टाचेचा बूट घातलेली, झकपक् पोषाख पेहरलेली, बाई आपणाशीं बोलत आहे हें अवलोकून तो भिकारी क्षणभर गांगरला व मग म्हणाला, 'माझं नांव कसं तुम्हाला ठाऊक ? काही का असेना ? तुम्हाला प्रश्न करण्याची माझी योग्यता नाही. माझी हकीकत मी थोडक्यांत सांगतों. मी एक फॉरेस्टकडे शिपाई होतों. एक वेळ साहेब लोक शिकारीला आले व त्यांच्या दिमतीला असतांना माझ्या डाव्या हाताच्या पुढच्या पंजाची पारध झाली. अगोदरच चवताळलेल्या वाघिणीनें एक नवराबायकोंचे जोडपे जमीनदोस्त केले होते. त्यांना माझ्याकडूनहि त्रास पोहोंचला होता. जंगलातील कांटासुद्धा विगरपरवाना त्यांना मीं जाळू देत नव्हतो. त्यांची एक मुलगी होती. काय झालें तिचें राम जाणे ? मीं सचोटीनें नोकरी केली, म्हणूनच रानातल्या रहिवाशांना मजपासून इजा झाली. त्यांच्या अडचणी मीं ध्यानांत घेतल्या नाहींत, पण पुढें मला वरचे अधिकारी लांचलुचपत चालवतात हें कळून आलें, तेव्हा मीं विचार केला, साहेब लांच खातों, सरपण फुकट मागतो, मध मिळवतो, रानातल्या अमूल्य औषधि विनामूल्य संग्रहाला ठेवतो, आपणही साहेबाप्रमाणें नोकरच.

आपल्याला रेंजर वरिष्ठ तसा तो अन्य कोणाचा तरी ताबेदार. हलके हलके मी लाच घेऊन जगलातल्या काहीं साधारण स्वरूपाच्या चोरट्या व्यवसायाला मोकळीक दिली. हरामचे खाण्याम मिळेना, तसा रेजर सतापला. गुरचराई न देता गरिबाचीं जनावरें मोफत चरू लागली, ज्याच्यापाशीं पैक्याचा अत्यत अभाव त्याच्या स्वैपाकपाण्याला जळण फुकट जाणे सुरू झाले. हें रेजरला कसे खपावे ? मी थोटा झालो, तरी युरोपियन इसमाना माझी धडाडी दर्शनाला आल्यामुळे मला कायम करण्याची बुद्धि परमेश्वरानें दिली. कालातराने गोविद शिपायाच्या वर्तणुकीने रेजरला फुकटचा माल भेटेना, म्हणून त्याने माझ्या गमावलेल्या डाव्या हाताच्या बोटाचा गाजावाजा करून मला काढून टाकण्याची यशस्वी खटपट केली. मी पैसे खातो असाहि मजवर ठपका बसला. अपराध दोघाचा एकच, परतु मी गरीब, माझी नोकरी गेली. मजसारख्या उतार वयाच्या व व्यगपूर्ण मनुष्याला काम कोण देणार ? अखेर मी भिक्षेकरी झालों—'

मिसेस् माथेरानवालानीं गोविदाची हकीकत ऐकून घेऊन मनीबॅग उघडली. तिच्या मनीबॅगमध्ये एकदर पाच अधेल्या, तीन चवल्या, इतकी रक्कम होती. तिनें ती सबध पिशवी गोविदाच्या थाळीमध्ये उपडी केली व अद्यापहि तिजकडे आश्चर्याने पाहणाऱ्या नवऱ्याशेजारीं जाऊन ती मोटरींत बसली.

आजूबाजूचे भिकारी नवलाने पाहत होते. जे आधळे होते, त्यानीं नाण्याचा आवाज येताच आपले कान टवकारले होते.

पण खुद्द गोविंदालाच जेथे त्या पारशी स्त्रीच्या वर्तनाचा खुलासा माहीत नव्हता, तेथें तो इतराना कुठचा कळणार !

# पचलेलें पाप : : : ६

कंपौंडर अगदीं जिकिरीला आला होता. कोणी ओळखीचे भेटलेच. तर अळेबळे तोंडावर हसू आणीत तो बोलत असे. कधीं कधीं अशा वेळींही त्याच्या चेहऱ्यावरील दुःखाच्या छटा लपल्या जात नसत.

तो एका तालुक्याच्या गावीं असलेल्या दवाखान्यात नोकरी करी. दवाखान्याजवळच दोन-दोन खणाच्या दोन खोल्या त्याला रहाण्यासाठी मिळाल्या होत्या. एवढ्याशा लहान जागेत एक धाकटा भाऊ, बायको व चार मुली यासुद्धा राहणे म्हणजे कोण अडचण होत असे ! पण कपौंडरला सवयीमुळे त्याचें विशेष वाटत नसे. त्याच्या बायकोचीं गेली तीन बाळतपणे याच जागेत पार पडलीं होतीं. कपौंडरची आपल्याला मुलगा व्हावा ही मोठी इच्छा ! बायकोच्या प्रत्येक बाळतपणाच्या आधीं त्याची आशा जागृत होई. पण लगेच ती विरून जात असे.

त्याचा भाऊ पधरा वर्षांचा होता. कपौंडरला त्याचा काडीइतकाहि उपयोग होत नसे. मराठी चौथीच्या परीक्षेला तो तीनदा बसला व तीनदा नापास

झाला. त्यानें शाळा टाकली. दोन वेळेला जेवणापुरता घरीं येऊन सारा दिवस तो गावच्या कुटाळक्या करीत असे. केवळ कर्तव्य म्हणूनच कपौंडर आपल्या भावाचा साभाळ करीत होता.

त्याच्या घरीं बायको व मुली यापैकीं सदैव कोणी ना कोणी आजारी असे. दुसऱ्याला रोगापासून बचावण्यासाठीं औषध देणारा कपौडर आपल्या कुटुबातील दुखणे काहीं बरे करू शकला नव्हता.

तो डाक्टरच्या हाताखालीं बरेच दिवस चाकरी करीत होता. त्यानें केव्हा डॉक्टरची अमर्यादा केली नाहीं. उलट डॉक्टरचा शब्द तो कधींच खालीं पडू देत नसे. आज्ञा पाळताना कधीं कधीं त्याला कष्ट होत, परतु डोळ्यावर कातडे ओढून तो सर्व काम बिनबोभाट करी. असें केलें, तरच आपला पगार पचविसाचा तीस होईल अशी त्याची खात्री होती.

तो मोठा धर्मिष्ठ होता. तो कधीं स्नानसध्या चुकवीत नसे. गुरुवारीं तो दत्ताला जाई, दर एकादशीला त्या गावापासून मैलभर लाब असलेलें एक प्रख्यात विठोबाचे देऊळ होतें, तेथे तो जात असे. हे त्याचे नियम, कधीं फिरतीची पाळी आली तरच ढळत मध्यतरी गावात प्लेग झाला होता. गाववाल्यानीं देवीचीं अनुष्ठानें, शकराचा अभिषेक, सर्व काही केलें पण या सर्वाच्या मुळाशी मुख्य कल्पक कोण असेल तर तो गणेशपत कपौंडरच.

इतके कर्तव्याला जागून, धर्माप्रमाणे वागून लाभ काय, तर रात्रदिवस ससाराच्या वाढत्या कटकटी अन् उरस्फोटी !! मग गणेशपताला याचा खेद वाटावा यात कसले नवल ?

× × ×

डॉक्टर पिसाळ याची दवाखान्यात येण्याची वेळ सकाळीं अकरा ते सध्याकाळीं पाच ही होती. परतु इतका वेळ क्वचितच त्याचें बूड दवाखान्यात टिके. ते काहीं महत्वाची प्रिस्क्रिप्शन्स कपौडरला लिहून देत, बऱ्याचशा केसीस् स्वतः तपाशीत; व थोडयाशा केसिस् गणेशपताला तपासण्याला सांगत. जेव्हां नडेल, त्या वेळीं कंपौडर डॉक्टराचा सल्ला घेण्यास त्याच्या बगल्यावर जाई. तो लोकलबोर्डाचा धर्मार्थ दवाखाना असल्यामुळें पैशाची भानगड विशेष नव्हतीच. सरकारी नोकराशिवाय इतराकडून दर-

दिवशीं एक आणा घेण्याचा रिवाज होता. शिवाय वर काय लाच मिळे ती. पैशाच्या बाबतीत डॉक्टराचा गणेशपतावर विश्वास होता. तो हिशेब चोख ठेवीत असे. डॉक्टर पिसाळाना दवाखान्यात लाच न मिळता परस्पर बगल्यावर मिळत असे. कपौंडरसारख्या क्षुद्र माणसाला त्यातला छदामही न दाखवण्याइतके पेशट शहाणे होते.

माणूस पाहून वागण्याची कला डॉक्टर पिसाळाना चागली अवगत होती. कोठे गभीर व्हावे व कोठे फिदीफिदी हसावे, कोणत्या रोग्यापुढें डोळे ओले चिब करावेत आणि कोणत्या रोग्यासमोर ते मिचकवावेत हे ते चागले जाणत होते. काही पेशट ते दवाखान्यात तपाशीत, तर कांही बगल्यातील खास स्वतःच्या खोलीत तपासण्यासाठीं म्हणून ते घेऊन जात. डॉक्टराची लहर हे काहीं याचे कारण नव्हते. गणेशपताला हें समजे. पिसाळानीं दवाखान्यातून तपासण्यासाठी म्हणून नेलेल्या पेशटानाही ते उमजे, पण असल्या प्रकाराची वाच्यता अजून कोठेच झाली नव्हती.

डॉक्टराची बायको स्वरूपाने बऱ्यापैकीं होती. ती गुणी असून नवऱ्यावर तिची भक्ति होती. नवऱ्याचीच तिच्यावर मर्जी नव्हती हे तिचें नशीब! तिला मूलबाळ नव्हते. दोन मुले झाली व गेली, पण तो काहीं तिचा अपराध नव्हता.

डॉक्टराच्या चुलत्याने त्याचे लग्न केले. त्यावेळीं डॉक्टर शिकत होते. प्रपचाचा फार मोठा गाडा त्याच्या चुलत्याच्या शिरावर पडला होता. त्यानीच मुलगी पसत करून डॉक्टराचे लग्न पार पाडले. लग्न झालें, तेव्हा डॉक्टर विद्यार्थी होते. त्याची दृष्टि आताइतकी चौफेर झाली नव्हती, म्हणूनच तेव्हा बायको त्याना आवडत होती.

आता सिल्कच्या सुटात फिरणाऱ्या डॉक्टर पिसाळाच्या मनातून त्याची पत्नी पूर्ण उतरली. तिची जुन्या चालीची वागणूक त्याच्या पसतीला येईना. डॉक्टराना चागला पगार मिळू लागल्यानतर पेडाची वेणी बांधणारी त्याची बायको जरी अबाडा बाधण्याइतपत नव्या धाटणीची झाली तरी तिचें एकदरींत बाळबोध वळण काहीं गेले नाहीं आणि एवढयाचकरिता डॉक्टर पिसाळ हे मनात सदा नाखुष असत. परतु कोणाजवळ या

गोष्टी ते कधीच बोलले नाहींत.

हलके हलके डॉक्टरनीं आपल्या मानसिक समाधानाचा फार निराळा मार्ग शोधून काढला व साहजिकच बायकोकडे त्याचे दुर्लक्ष होऊ लागलें.

असाच एकदा एका शाळामास्तरणीचा व डॉक्टराचा संबंध आला. त्या तालुक्याच्या ठाण्याजवळच्या खेडेगावीं एका मुलीच्या शाळेवरील ती मास्तरीण होती. डॉक्टर पिसाळ त्या गावीं कामानिमित्त वारवार गेले होते. परंतु त्यानीं त्या मास्तरणीला कधीं बघितले नाहीं. तिलाच ठेच लागल्याच्या निमित्तानें एक किरकोळ जखम झाली व डॉक्टराकडे ती औषधासाठीं म्हणून गेली होती!

शहरगावीं राहिलेल्या माणसाची वागणूक कधीं झाकायची नाही. नीरा जरी नोकरीनिमित्ताने खेडेगावी राहिली होती, तरी शहरातील चालू फॅशन अजमावून ती अगवळणीं पाडण्याचा तिचा स्वभाव बनून गेला होता. शाळामास्तरीण म्हणजे खेड्यात काहीं कमी तोलाची व्यक्ति नसते. नीराला हे समजत होते व आपल्या पोषाखाने मूळच्या दर्जात भर घालण्याचा ती प्रयत्न करीत असे. नाकाडोळ्यानी नेटक्या बायकात मोडत असल्या-कारणाने नीरा इतर खेडेगावच्या बायकात उठून दिसे. काहीं लोक तिला आदराने पाहत, तर काहींजण नीरेला छचोर म्हणत.

नीरा मोठी धूर्त होती. नवरा अकाली वारल्यामुळे व धाकट्या भावा-खेरीज सासर माहेरचे कोणी मायेचे नव्हते म्हणून तिने हा पेशा पत्करला होता. तसे करताना तिला पुष्कळ अडचणी आल्या, अनेक प्रसंगाना तोंड द्यावे लागले, परंतु सगळ्यातून मोठ्या कावेबाजीने तिने आपला मार्ग काढला. ती स्वतः स्वतंत्र झाली आणि तिने आपल्या भावाला स्वतंत्र होण्याइतके शिक्षण आपल्या हिमतीवर दिले.

जगात उघड्या डोळ्यानी नीरा वावरत होती. कोणी पैसेवाला जर तिच्या रूपावर बेहोष होऊन आला, तर त्याला लग्नाची स्पष्ट मागणी ती करीत असे व अशीच मागणी तिने डॉक्टर पिसाळाना केली.

नीरेचा सहवास कायमचा मिळाला तर तो डॉक्टराना हवाच होता. सध्या ती गोष्ट शक्तीबाहेरची समजून ते नीरेच्या किंचित्काल सहकार्याची

अपेक्षा करू लागले.

एखादी स्त्री फार बाणेदार वर्तन करू लागली, तर तिला नमवण्याची व रमवण्याची विषयी पुरुषाची आकांक्षा अतीच उत्कट होते. डॉक्टर पिसाळाच्या बाबतींत असेंच झालें होते.

नीरेच्या खेडेगावीं त्याचे सारखे हेलपाटे घडत, केव्हा केव्हा ते नीरे-कडे राहूही लागले. मात्र नीरेचा धाकटा भाऊ तिच्याजवळच राहत असल्यामुळें डॉक्टराच्या अशा वस्तीचा वेडावाकडा अर्थ लोकांकडून घेतला जात नव्हता. नीरेने डॉक्टराची आपल्यावरील आसक्ति पाहून आपली विवाहाची मागणी तर मागे घेतली नाहींच; पण उलट अटींची संख्या एका आकड्याने वाढविली. तिचा धाकटा भाऊ कपौंडरची परीक्षा पास झाला होता. जागा रिकामी नसल्यामुळे त्याला नोकरी मिळत नव्हती. नीरेने डॉक्टर पिसाळांना आपल्या भावाला अन्नपाण्यास लाव-ण्याला सांगितले.

डॉक्टर नीरेच्या गावीं राहण्यास जाताना गणेशपंत कपौंडराला सांगत, " सीरियस पोलिस-केस आहे म्हणून गेलों असं सांग, केव्हा येईन ते नक्की नाहीं; दुसरी एखादी सरकारी केस आली, तर मला ताबडतोब कळव."

धडधडीत खोट्या निरोपानें डॉक्टरीणबाईंना फसवणे गणेशपंताच्या जिवावर येई. पण त्याचा इलाज नव्हता. तो हुकमाचा ताबेदार होता. डॉक्टरशीं प्रतारणा करणें म्हणजे त्याच्या नोकरीला कट्यार लागणें होते.

* * *

डॉक्टर पिसाळांनीं नीरेचा ध्यास घेतला. तिच्या दोनही अटी एकदम पुऱ्या कशा कराव्या या विवचनेंत ते होते. येईल तशी संधि साधून बेत उरकण्याचा त्यांचा विचार कधींच ठरून गेला होता.

एके दिवशीं सकाळीं डॉक्टरीणबाईंना किंचित ताप आला. डॉक्टर पिसाळांना तसें कळताच त्यांनीं तिला औषध दिलें. ताप न उतरतां सारखा एकएक डिग्री चढत होता.

* * *

मग डॉक्टर पिसाळ भयचकित चेहऱ्यानें बायकोला म्हणतो, "तुला आता प्लेग होणार, चिन्हें स्पष्ट दिसत आहेत."

भावडी बिचारी! घाबरून गेली!! तिला ते खरे वाटले!!! गावांत प्लेग दोन वर्षांपूर्वी येऊन गेला होता. दुखणेकऱ्याच्या हालअपेष्टा तिनें प्रत्यक्ष पाहिल्या होत्या. त्या चर्मचक्षूपुढें उभ्या राहून तिच्या डोळ्यात नकळत अश्रु उभे राहिले.

डॉक्टरच्या धद्यात शिरलेला इसम बहुधा कठोरहृदयी असतो. डॉक्टर पिसाळही त्याला अपवाद नव्हते. दवाखान्यात जाताना ते आपल्या बायकोला बोलले, 'मी कामाला जातो. शक्य तितका लौकर येईन. कदाचित् रात्र झालीच, तर यायला फार फार म्हणजे बारा वाजतील!'

* * *

दुपारी तीनचे ठोके पडेपर्यंत डॉक्टर पिसाळ दवाखान्यातच काम करीत होते. नतर घाईघाईने उठून व कोट टोपी चढवून जवळच पावडर वजन करीत असलेल्या गणेशपताला ते म्हणाले, 'गणेशपत, तू अन् हा शात्या गडी दोघेजण मिळून आज रात्री माझ्या वाइफची शुश्रूषा करा. मी एक तासाने गावाला निघणार आहे. उद्या येईन. तिची प्रकृति नीट पहा अ. सीरिअस् आजार आहे. तुमच्या दोघावर जबाबदारी सोपवून जात आहे. आणि हे पहा गणेशपत, उद्या तुझी मी बोर्डाकडे शिफारस करतो. तू इतके अर्ज केलेस, पण सगळे फाइलीला लावले गेले. आता माझ्या शिफारशीचा प्रभाव बघ. पुढच्या पहिल्या तारखेला तीस रुपये वाजवून पगार घे.'

शिवाय शेजारीच असलेल्या शात्या गड्याला त्यानीं कम्पौन्डरला मदत करण्यास निराळे सागितले.

पण नतर पुन्हा ते शात्याला एकीकडे भेटले आणि त्याच्या खिशात एक दहा रुपयाची नोट कोंबीत डॉक्टर पिसाळानीं शात्याला जो मजकूर पढवला तो गणेशपत कपौन्डरला कसा कळावा?

* * *

गणेशपत व शात्या दोघेही रात्रीं आठच्या सुमारास डॉक्टराच्या बगल्यावर गेले. गणेशपत जाताना आपल्या बायकोलाही बरोबर नेणार होते, पण त्याची एक मुलगी आजारी असल्यामुळें तिच्याजवळ कोणी तरी हवे होते. तेव्हा शात्याला बरोबर घेऊन कपौन्डर एकटेच गेले.

डॉक्टरीणबाई कण्हत अथरुणावर पडल्या होत्या. जवळच शात्याने त्याना जरा वेळापूर्वी आणून दिलेला खानावळींतील डबा तसाच भरलेला होता.

गणेशपताला पाहिल्यावर त्या किंचित् आश्चर्याने म्हणाल्या, 'गणेशपत, आज या वेळीं कुठे तुम्ही ? घरी येणार आहेत ना ते ?'

'नाहीं, आज दुपारीच तुम्हाला सोबत करण्यासाठीं आम्हा दोघाना सागून ते गावाला निघून गेले.'

'अन् मला कसे म्हणाले, मी बारा वाजता परत येतो म्हणून ?' थोडयाशा काळजीयुक्त स्वराने डॉक्टरीणबाईंनीं विचारले.

'मग बरेच झाले !' गणेशपत म्हणाला, 'तोपर्यंत आम्हीं इथे आपणास सोबत बसतों, काही औषध वगैरे द्यावयाचे असेल तर देतों...'

'तिकडून म्हणायचें झाले, तुला प्लेग होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. माझ्याशीं मनमोकळेपणाने बोलणे कधींच होत नसल्यामुळे अधिक विचारण्याचा धीर झाला नाहीं. मला बाई भीति वाटते.'

'खरे कीं काय ?' गणेशपत थरारून बोलला.

'शात्या' बाईसाहेब मध्येंच काहीं आठवून, जवळच उभ्या असलेल्या शात्या गडयाला म्हणाल्या, 'अधार गडद पडला आहे. बगल्याचीं दारे, खिडक्या बद केल्यास ?'

शात्याने नकारार्थी मान हालवली, तेव्हा त्यानीं त्याला तसें करून येण्यास सागितलें.

गणेशपताच्या डोक्यात औषधयोजनेचा विचार चालला होता. त्याला काहींच सुचेना. जराशानें शात्या परत आला, तेव्हा त्याला गणेशपताची मुद्रा चिंतातुर दिसली.

'तुम्हाला प्लेग होणार असे डॉक्टर म्हणाले ? मला वाटलें नाहीं पुन्हा प्लेग उद्भवेल. आमच्या दवाखान्याचें इनॅक्युलेशन, शिवाय गावकऱ्याची

देवाची आराधना....'

' कपौन्डरसाहेब ' शात्या मधेच गणेशपताला अडवून म्हणाला, ' डॉक्टर खोटें कसे बोलतील ? आपण बाईसाहेबाचें म्हणणें खरें धरून चालू, बारा वाजेपर्यंत त्याची वाट पाहू, नाहीं तर तुम्ही स्वतः बाईसाहेबाची प्रकृति बघा. मोठया रोगाच्या वेळीं शक्य तेवढा आधीं उपचार केलेला बरा.'

' ठीक बोललास शात्या, तसेच आपण आता करू.' गणेशपताला शात्यानें सुचवलेला मार्ग पटला.

बारा वाजेपर्यंत वाट पाहिली, तरी डॉक्टर आले नाहींत. तेव्हा गणेशपंत जातीने बाईसाहेबाची प्रकृति पाहण्यास सिद्ध झाला. त्या हेतूनें त्याने बाईसाहेबाचा हात आपल्या हातात घेतला व त्याच्या अगातील ताप तो पाहू लागला.

गणेशपतानें चाचणी अतिशय सावकाश व काळजीपूर्वक चालविली होती. आपल्या तपासणींत तो इतका गढून गेला कीं, शात्या दार लोटून घेऊन केव्हा निघून गेला हें त्याला समजले देखील नाहीं.

बाईसाहेब अर्धवट झोपेच्या गुगींत होत्या. गणेशपताने आपल्या डाव्या हातात बाईसाहेबाच्या एका हाताची नाडी ठेवून उजवा हात तापाचा अदाज घेण्यासाठी म्हणून कपाळावर ठेवला, तोंच—

' चागले ढग सुरू आहेत गणेशपत ! ' दार खाडकन् उघडून आंत येत डॉक्टर पिसाळ गरजले, ' या तुमच्या प्रेमालापात दाराला आतून कडी लावून घेण्याची गोष्ट मात्र...'

' काय बोलता हें आपण ? ' बाईसाहेब ताड्कन उठून बसत ओरडल्या. गणेशपत केव्हाच उठून दूर उभा राहिला होता.

' आता प्रत्यक्ष पाहिल्यावर बोलण्याची जरूरीच काय ? हा गणेशपंत या वेळीं इथे कसा ?...'

' आपणच ना त्याना सोबत म्हणून...'

' परपुरुषाची बायकाना रात्रीची सोबत ? ' डॉक्टर उपरोधिकपणें हंसत गणेशपताकडे नजर रोंखीत म्हणाले, ' काय हो गणेशपत, याच्या आधीं अशा थापा मारून किती रात्री तुम्ही माझ्या बायकोला सोबत केली ? '

'डॉक्टरसाहेब' गणेशपताचा शब्द कापरा येत होता. 'आज दुपारीं तुम्हीच शात्याला व मला बाईसाहेबाना रात्रीची...'

'शात्या! कुठे आहे तो?'

'खरेच, शात्या कुठे आहे?' बाईसाहेबानीं गणेशपताकडे पाहत विचारले.

गणेशपताने इकडे तिकडे पाहिले व खालीं मान घालून चाचरत म्हटले, 'बाईसाहेबाना लेग झाला असे तुम्ही म्हणालात......'

'तसे मी तुम्हाला केव्हा म्हणालो? सकाळी तिला किंचित कसर आली होती. मीं औषध दिले तेव्हा तिचे अग जरा जास्त तापले होते, पण आता ती पूर्ण बरी झाली असेल. माझी शका व्यर्थ होती मला ती खरी वाटली असती, तर खात्रीने तितक्या काळजीने मी वागलो असतो. मग मोटरींतून चैनींत फिरलो नसतो! आता तमाशालाही गेलो नसतो, पण तुम्हाला माझ्या बायकोबद्दल मजपेक्षाही अधिक प्रेम! खरेच, मी शात्याला बारा वाजता मला बोलवायला उगीच सांगितले! तमाशाला तिकडे चागला रग चढत होता व इकडे तुमच्याही चाळ्याना ऊत आला होता.' नतर डॉक्टर बायकोकडे पाहत बोलले, 'बाईसाहेब, उद्या सकाळीं माहेरीं चालू लागा. उगीच आकाडताडव कराल, तर मला तुमच्या अब्रूचा जाहिरनामा वेशीवर टागावा लागेल. स्त्रीच्या इज्जतीला एकदा कलक लागला, कीं तो धुवून टाकायला प्रत्यक्ष ईश्वरालाच कलकि अवतार घ्यायला हवा हे लक्षात ठेवा. शिवाय तसे केल्यानें तुमचा प्रियकर तुरुगात जाण्याचाही फार सभव आहे. तुमची विम्याची रक्कम मी निघते वेळी तुमच्या हवाली करतो.' मग गणेश-पताकडे रागानें पाहत ते म्हणाले, 'गणेशपत, याच्याबरोबर तुम्हीही काळे करावें हें उत्तम, आता नाही गेलात तरी आणखी आठ दिवसात मी तुम्हाला तसें करायला लावतों. तुम्हाला पगारात बढती द्यायला लावणे माझ्या हातात नसले, तरी तुमची वाईट रिपोर्टाने उचलबागडी करणें माझ्या पूर्ण स्वाधीन आहे.'

दुसऱ्या दिवशीं सकाळीं डॉक्टराची बायको माहेरीं निघून गेली. गणेश-पंतानें बडतर्फ होण्याऐवजीं राजीनामा देऊन नोकरी सोडणें अधिक

पसत केलें. बिचारा कपौंडर कपाळावर हात मारीत आपल्या तुटपुजा उत्पन्नाच्या शेतवाडीकडे गेला.

लौकरच नीरा व डॉक्टर पिसाळ याचा विवाह झाला. नीरेच्या भावाला पिसाळाच्या खटपटीनें गणेशपताची रिकामी झालेली कपौडरची जागा मिळाली.

विवाहानिमित्त सर्व गावकऱ्याना बडे जेवण मिळालें होतें. डॉक्टराच्या दुसऱ्या लग्नाविषयीं ज्यानें त्यानें आपला तर्क लढविला. पण मारुतीच्या पारावर प्रहर प्रहर बसून गावच्या नसत्या उचापती करणाऱ्या लोकानाही नक्की असा काहींच होरा बाधता आला नाहीं.

× × ×

सुमारें महिन्याच्या अवधींत डॉक्टर पिसाळानीं आपली बदली कारवार जिल्ह्यात करून घेतली. देशावरून ते कोकणात राहण्यास गेले. ही बातमी गणेशपताला कळली, तेव्हा तो मनाशीं म्हणाला, ' देशत्यागात एक पाप पचवून आणि एक शाळामास्तरीण इथून घेऊन गेलेला हा पिसाळ तिकडच्या कोकणप्राातील एखादी गोवेंकरीण इकडे न आणो म्हणजे झालें!'

× × ×

डॉक्टर पिसाळानीं कोकणात गेल्यावर अनाथ बालिकाश्रमाला एक मोठी देणगी दिली व आपलें नाव वर्तमानपत्रात प्रसिद्ध झालेले पाहिलें. इतर कित्येक सस्थाना त्यानीं वेळोवेळीं लहानमोठया रकमा अर्पण केल्या.

सार्वजनिक कामात ते अलिकडे विशेष लक्ष घालीत असत. जनतेच्या आरोग्याची दक्षता डॉक्टर पिसाळ याना नेहमीं असे. मॅजिक लॅटर्नच्या साहाय्यानें व्याख्यानें देऊन त्यानीं आरोग्याबाबत उपयुक्त माहिती बरेच ठिकाणीं सागितली.

तालुक्यातील सर्व लोकांत डॉक्टर पिसाळाची प्रशस्ती गाण्याची जणूं अहमहमिकाच लागून राहिली होती. प्रत्येकजण गौरवाचे शब्द काढी, ' असा डॉक्टर या तालुक्यांत अजूनपर्यंत आला नाहीं. केवढी लोककल्या-

णाची पर्वा ! जनतेच्या हितापुढें स्वतःच्या पैशाकडे व श्रमाकडे बिलकुल पाहायचा नाहीं. तसें पाहिलें, तर लोकलबोर्डाचा पगारी नोकर; पण बाधवाच्या फायद्यासाठी इतका झटतो, कीं एखाद्या पुढाऱ्यानेंही याच्यासमोर लाजावे ! !’

# ओलेती : : : ७

सगळे जेथल्या तेथे असताना मनुष्य समाधानी का नाहीं रहात ?

वास्तविक दीनेशला काय कमी होते ?

एकशेदहा रुपये दरमहाची मिलिटरी अकौंटच्या ऑफिसमध्ये नोकरी, दोन वर्षे लोटलीं चाकरी लागल्याला.

अद्याप तो कायम नव्हता.

पण केव्हा तरी झाला असता.

चालू घटकेला ग्रॅज्युएट इसमाला कुठे मिळताहेत एवढे पैसे !

अन् लतिका–दीनेशचा जीवप्राण !

हो.

ती पहा दीनेश आरामखुर्चीवर पडला असताना आलीच चहा घेऊन.

' ओऽहो, तरी आत स्टोव्हचा आवाज येत होता–'

' मग आला नाहींत ! आताशा असच चालल आहे रोज...'

चहाचा कप दीनेशपुढें ठेवून लतिका आत झट्दिशीं निघून गेली.

खरेंच, कितीही जपले, तरी एवढ्या तेवढ्यात घसरतेच.

दीनेशने चहा बशींत ओतला.

लतिकेचा हळुवार जीव. इतकेसें चितेचें कारण उद्‌भवले, कीं तिच्या अत:करणाला कित्येक दिवस तरी हुरहुर लागून राही.

पदोपदीं दीनेशला तिच्या मनोरचनेची जाणीव येत होती.

परळमधील त्याचे वास्तव्याचें ठिकाण म्हणजे एक चाळीवजा इमारत होती.

आसपासच्या समवयस्क युवतींशीं लतिकेचे नेहमीं मेतकूट—

कधीं बिनसले, कीं त्याची वर्दी दीनेशच्या कानावर जाईच.

'सागाव ना, चुकल का काहीं माझ!' असे विचारून दीनेशलाच ती सतावून सोडी.

लतिका सदा घोकी असा आणखी एक विषय होता.

ज्या प्रसगानें लतिका व दीनेश एकत्र आलीं त्याच्याशीं निगडित होता तो विषय.

एकदा कॉलेजमध्ये पोहण्याची शर्यत झाली.

विद्यार्थी–विद्यार्थिनींचा प्रेक्षकगण खूप जमला होता त्या समयी—दीनेशनें पहिलें पारितोषिक मिळवलें.

दुसऱ्याच दिवशीं त्याला लतिका भेटली.

'मला शिकवाल पोहायला?' तिनें विचारलें.

'हो हो, जरूर.'

'किती दिवसात येतें?'

'ज्याच्या–त्याच्या मगदुरावर आहे बुवा हें अवलबून!'

'बर, मी असतें कॉलेजच्या रेसिडेन्सीमध्यें– तुमचा पत्ता द्या मला—'

'काहीं गरज नाहीं, जुहूला भेटत जा.'

लतिकेला चागलें येऊ लागलें पोहायला.

अन् मग एक दिवस ती पोहण्याच्या चड्डी व फ्रॉकनिशीं ओलेतीच असता—

दीनेशनें कोटाच्या खिशातला कॅमेरा काढला.

'मला हव्या तशा पोझिज् देता का?'

लतिकेनें आढेवेढे घेतले.

'फार नको! अगदी मला हवी तशी एकच पोझ्!'

लाजत लाजत लतिकेनें दिनेशच्या म्हणण्याबरहुकूम केले.

तथापि नतर ती म्हणाली 'छायाचित्र कोणाला दाखवायच नाहीं हं, अगदीं जिवाभावाच्या मित्राला दिखील.'

'म्हणजे तुम्हाला सुद्धा—?'

'इश्य!—' लतिका क्षणभर गोंधळली, व मग बोलली, 'पण तुम्हाला कळला आहे माझ्या म्हणण्याचा अर्थ! सागा ना? कुणा कुण्णाला नाहीं ना दिसणार हा फोटो..'

'अऽहं, तुमच्या मर्जीविरुद्ध वागणार नाहीं मी.'

'आता मी तुम्हाला पोहण्यास का शिकले ते सागू? माझ्या लहानपणची हकीकत. सध्या मी आहें ना, या वयाची मला एक बहीण होती.. त्या वेळीं बिचारी पावसाळ्यात पुराचे पाणी बघायला गेली. पाय निसटला...तिला पोहण्यास येत नव्हत. बुडून मेली ती!'

'काय नाव तिच?'

'ज्योतिष्मती.'

'ज्योतिष्मती पाटणकर. आपल्याच कॉलेजात होती ना ती?'

'हं!'

'त्याकाळचे गाजलेले प्रकरण होतें तें, प्रेमभगाकरता आत्महत्त्या केली तिन'

'कशावरून? माझे आईबाप तर म्हणतात...'

'माझ्या घरीं पन्नास वर्षांच्या वर्तमानपत्राच्या फायली आहेत. मी दाखवीन तुम्हाला तिचा फोटो—कोणी मोहिते आडनावाच्या तरुणावर तिच प्रेम बसल होत. परवाच मीं तिच्या चित्राच कटिग काढल आहे...!'

'नवलच आहे. तुम्हाला जवळ बाळगण्यासारखे काय आहे त्या कात्रणात?'

'स्पष्टच बोलतों—तुमची भगिनी थेट तुमच्यासमान स्वरूपानं आहे...

तेव्हा वाटलं, असू द्यावा फोटो...आता नवीन छायाचित्र मिळाल; त्याची नाहीं परवा...'

'मला एकदा दाखवा तें वर्तमानपत्राच कात्रण. प्रेमनिराशेमुळ आत्मत्याग केला बहिणीन माझ्या!' लतिका स्वत:शीं अचबा करीत होती.

पण दीनेशनें सर्व हकीकत खरी असल्याची जेव्हा लतिकेची खात्री पटवून दिली, त्या समयापासून लतिकेचे हळुवार चित्त नुसतें हेलावून गेले.

घरच्या माणसाच्या खोटेपणाचाहि तिला सताप आला.

दीनेशला ती वारवार भेटे.

नेहमीं नेहमीं त्याला लतिका म्हणे, "प्रीतिभाव तुटला की त्याचा असा परिणाम घडतो, का मेली माझी बहिण? बेधडक तिन स्वत:च्या मनाप्रमाण मार्ग आचरायचा..."

एकाच बाबीचा पुनः पुन्हा उच्चार करण्याची लतिकेला जी घातुक सवय होती, तिचा दीनेशला तेव्हापासून प्रामुख्यानें प्रत्यय येऊ लागला.

आपल्या भगिनीचा आत्मत्याग लतिकेने इतका मनाला लावून घेतला, कीं परीक्षा नापास झाली ती!

ह्या वेळीं दीनेश एम्. ए. च्या टर्म्स भरता भरता एकीकडे नोकरी शोधीत होता. सुदैवानें त्याच्या अर्जाला सरकारी कॉल आला.

लतिका त्याच्याशीं विवाहबद्ध झाली.

ती ब्राह्मण तर दीनेश कायस्थ प्रभू.

आतर्जातीय शरीरसबध होता तो, तरी फारसा गाजावाजा न घडतांच तें लग्न तडीला गेलें.

मात्र आज तहत दोन वर्षें लतिका व दीनेश आपल्या नातलगाच्या घरोब्याला मुकलीं.

अजून लतिका आपल्या बहिणीची—ज्योतिष्मतीची आठवण काढी.

असली डोक्यात एकच एक विचार घोळणारी पोर, तिचा स्वभाव दीनेशला पूर्ण परिचयाचा होता.

मग कशाला सागेल तो तिला हृदयाची व्यथा काहीं असलीच तर! संसारात काहीं कांहीं धक्के असे बसतात कीं भक्कम माणसाच्याही काळजाचे ठोके

बंद–निदान मद तरी व्हायचे.

मग अल्लड–हलुवार अंतःकरणाची, काटा खुपला तरी काळाला आमंत्रण देणारी सहचारिणी जोडीला जर असेल......

दीनेश समंजस होता.

तो लतिकेशीं हसायचा, खिदळायचा, नऊ वाजतां कचेरींत निघायचा, ठरल्या वेळीं माघारी यायचा.

सारें काही नेहमीचेंच.

तरी लतिकेला दीनेशमध्यें फरक आढळेच अलीकडे !

हेच बघा कीं !

लतिका स्टोव्ह पेटविताना मदत करी दीनेश तिला.

आताशा तो तसे करीत नसे.

झाली लतिकेच्या बायकी मनाची हुरहुर सुरू !

पुढच्या महिन्याला तर लतिकेला खरोखरीच लागेल अशी गोष्ट घडली.

नेहमीप्रमाणे पगाराचे पैसे दिले नाहींत तिला दीनेशने.

व्यसनी बनला की काय दीनेश ?

चालढकल का करतो पगाराची रक्कम द्यायला ?

रोज लतिकेच्या अंतरीची धडधड वाढत्या श्रेणीनें होती.

एक दिवस शेजारीण धावत धावत लतिकेकडे आली.

मासिकाचा अंक होता तिच्या हातात.

‘ लतिकाताई, तुमचे यजमान उत्तम फोटोग्राफर आहेत. बाकी तुम्ही पाहिलच असेल त्याच कौशल्य.’

लतिकेनें मासिकाचा अंक उघडला.

—खरेच—ती लाजली.

‘ ओलेती ’—तिचाच फोटो होता तो.

शंभर रुपये बक्षिस मिळाले होते त्या कसबाला—

‘ मींच पोज दिली होती.’

दीनेशनें कळवलें सुद्धा नाहीं फोटो धाडण्याच्या अगोदर मला.

लतिका रागावली थोडीशी.

त्याच सध्याकाळीं दीनेश शभर रुपये देत तिला म्हणाला 'या घे पगाराच्या नोटा, दहा रुपये खर्च झाले या वेळेला माझ्या हातून.'

फोटोची बात मुद्दामच लतिकेनें काढली नाहीं.

दीनेशहि त्याबद्दल मौनव्रत धरून होता.

'हे पगाराचे पैसे कीं फोटोच बक्षिस? वर्तमानपत्रात देखील जें जाहीर झाल, ते मला सागायला दीनेश भितो? माझ्याशी प्रतारणा! पण बोलतो किती गोड...'

'का असें मानभावीपणाचें वर्तन?...'

वरचेवर लतिका सुकट दिसू लागली.

तरीहि दीनेशाचा आपला तोच दिनक्रम कायम!!!

त्या सायकाळीं घरीं येताक्षणींच दीनेश उद्गारला, 'लतिका, समुद्र-स्नानाला येतेस? पुन्हा ओलेत्यान बघावस वाटत तुला!'

'सारखे सारखे पैसे नाहीं लाभायचे एकाच पोजवर—फारशी खुषींत दिसती आहे स्वारी आज?'

'वाः वाः एरवीं नसतों वाटतें...'

'समजत बर का साऽऽर मला!'

'म्हणूनच म्हणतो समुद्राच्या सान्निध्यात चल; मोकळ्या हवेंत, मोकळ्या पाण्यात जाऊ. हृदयात गुदमरून ठेवलेल सगळ सगळ सागायच आहे मला...!'

* * *

'आणि त्या तुझ्या चित्रानच केवढे उपकार केले मजवर! माझी नोकरी गेली होती...' तिच्या अगावर पाणी उडवीत दीनेश बोलला.

'म्हणजे?'

'अस धडधडत्या उरान, कापऱ्या शब्दानी विचारू नकोस! तुझा हुळ-हुळा स्वभाव ठाऊक आहे मला. तेव्हाच जीभ आवरती घेतली फिरून तीच चाकरी मिळेपर्यंत...'

लतिका आश्चर्यानें उभी राहून ऐकत होती.

'आमच्या ऑफिसात एक बेरीज वजाबाकी करणार यन्त्र आलं व

त्यामुळ दीडशें कारकून कमी झाले. त्यातलाच मी एकजण; पण तुला काहीं न कळवता मी ऑफिसच्या टाइमला बाहेर जात होतों...'

'आपल्या वृत्तींत तफावत पडल्याच माझ्या निदर्शनाला येतच होत...'

'वेळ भरपूर होता. वाचनात मी काळ घालवीं. एका मासिकांत फोटोची कॉपिटिशन होती–' ओलेती ' या नावान तुझ लग्नाआधीं घेतलेल छायाचित्र मीं पाठवल.'

'व कोणाला ते न दाखवण्याबद्दलचा आपला विश्वासाचा शब्द मोडलात.'

'तू माझीच झाल्यावर ही कृति वावगी दिसली नाहीं. अशान शेंपन्नास रुपये तर हातात पडलेच, पण शिवाय नोकरीहि .'

'ती कशी बाई ?'

'तू आपली थोरली बहीण ज्योतिष्मती हिच्यासारखीच हुबेहुब दिसतेस. तिन प्रेमभगाच्या दुःखान स्वर्ग गाठला. तिचा प्रियकर म्हणजेच आमचे मोहितेसाहेब ! आमच्यावरील अमलदार ते, अविवाहितच आहेत अद्याप. तुझा फोटो बघितल्यामुळ साहेबानीं मला मुद्दाम जिज्ञासेन बोलावल; एकदर चौकशी केली, इत्थभूत वृत्त बाहेर आल. माझ्यासाठीं मोहितेसाहेबानीं वरिष्ठाकडे रदबदली करून माझी नोकरी परत देववली.'

'ह्या इतक्या उलाढाली माझ्या अपरोक्षच.'

'काय करता ! हळव माणूस सोबतीला असल, कीं मोठी चमत्कारिक अवस्था होते. कमजास्त घडल की हृदयाला धक्का बसेल हे भय; ह हं लतिका, क्रोधायमान होऊ नकोस, तशीच उभी रहा, किती आकर्षक वाटते माझ्या नेत्राना ही ओलेती ..'

'चला...' लतिकेने खूपसे पाणी दीनेशच्या तोंडावर फेकलें.

# क्रिकेट वेडी : : : ८

त्या गावात काहीं कामासाठीं म्हणून मी दोन दिवसापुरता गेलों होतों. पण काम झाले पण मोटार निघायला अजून दोन तास आवकाश होता. काय करावे हें सुचेना.

' गोपू मामा ' मी ज्याच्याकडे उतरलों होतों त्या गोपूमामाना विचारले ' एकादें गोष्टीचें पुस्तक आहे का वाचायला ? '

' कोणाला एवढी वाचनाची गोडी आहे ' गोपू मामा म्हणाले, ' पण आहे. माझा पुतण्या जगू परवा दिवाळीच्या सुट्टींत आला होता त्याला गोष्टी लिहिण्याचा फार नाद. जाताना किती भाराभर गोष्टी लिहून नेल्या इथून. पण एक गोष्ट तो इथेंच विसरला आहे. हवीतर देतों.'

गोपूमामानीं मला ती गोष्ट आणून दिली व ती वाचू लागलों.

" ललितेच्या बाबाना पहिल्यापासून क्रिकेटची आवड फार ! लहानपणीं त्याना तो खेळ कधींच साधला नाहीं. उत्तम खेळाडू होण्यासाठीं किती परिश्रम घेतले त्यानीं; पण ते सर्व निष्फळ झाले. तरी म्हातारपणा-

पर्यंत त्याची क्रिकेटची आवड कायम राहिली.

आणि तेवढ्यासाठींच तर आपल्या ललितेला त्यानीं 'श्री' हा वर शोधून ठेवला होता. त्याच्या मतानें श्री म्हणजे आणखी दहा वर्षांनीं होणाऱ्या क्रिकेटच्या चौरंगी सामन्याचा हिंदूकडून कॅप्टन होता.

ते ललितेला म्हणत, 'पाहिलेस की कसा कीर्तिमान तो. मी स्वत: एकदोनदा त्याला खेळतानाही पाहिला आहे. तुमच्या कॉलेजच्या टीमचा उत्तम खेळाडु म्हणून त्याचा होणारा गौरव मी नेहमी वर्तमानपत्रात वाचतों. अशा गुणी लोकाना या बेकारी जगात जॉब हा ठेवलेलाच. एखाद्या महा-राजाच्या पदरीं बोलिंग शिकविण्यास म्हणून राहतील.'

पण ललितेला बाबाचे हें बोलणें मुळीसुद्धा आवडत नसे. ती लगेच तेथून उठून जाई. ललितेनें स्वतः क्रिकेटची मॅच कधींच पाहिली नाही- ती वर्तमानपत्रें वाची पण त्यातला क्रिकेटविषयींचा मजकूर गाळून. थोड-क्यात सागायचे म्हणजे तिला क्रिकेट विषयीं अत्यत तिटकारा होता आणि त्याला कारणही तसेच होते.

लहानपणी तिला कुत्र्याची फार आवड. तिनें स्वतः एक कुत्राही पाळला होता. त्याला घेऊन एक दिवस ती श्रीकडे गेली. व सहज म्हणाली "कायरे श्री, आमचे बाबा नेहमीं क्रिकेट, क्रिकेट करतात. क्रिकेट म्हणजे काय रे ?"

श्री म्हणाला "ते तुला इतक्यात कळायचं नाहीं, पण मी तुला थोड-क्यात सागण्याचा प्रयत्न करतों. क्रिकेट म्हणजे बोलिंग, बॅटिंग फिल्डिंग,"

'बोलिंग म्हणजे काय ?'

'बोलिंग म्हणजे . हें बघ, हा दगड हा चेंडू समज. थोडा मोठा आहे हा चेंडूपेक्षा आणि जडही आहे...पण समज—नतर तो समोरचा दगड म्हणजे स्टप समज. नंतर असा स्टार्ट घ्यायचा. असा चेंडू फेकायचा आणि अशी दाडी...'

इतक्यांत ललितेचें कुत्रे विलक्षण जोरानें केंकाटलें.

श्रीचा नेम चुकून बिचाऱ्या कुत्र्याच्या पाठीला जखम झाली. 'आग लाव तुझ्या त्या क्रिकेटला...' असें म्हणत ललिता रागानें कुत्र्याला

घेऊन तेथून निघून गेली.

आणि हेच तिच्या क्रिकेट विषयीच्या तिरस्काराचे कारण.

नतर एक दिवस इटर–कॉलेजिएट डिबेट झाला. क्रिकेट हा विषय होता. व श्री ललितेच्या कॉलेजचा पुढारी होता.

बाबासाहेब डिबेटला आले होते.

ललिता अर्थातच गेली नव्हती.

त्या रात्रीं बाबासाहेब ललितेला म्हणाले “ असा विषय छान रगला होता. क्रिकेटचा खेळ आवश्यक आहे, असे श्रीने किती सुदर रीतीने प्रतिपादन केले. पण त्याला विरुद्ध पार्टीही दुसऱ्या कॉलेजचा रत्नाकर म्हणून होता. त्याने जोरजोराने सागितले की, ‘ महाराष्ट्राला क्रिकेटची मुळीच आवश्यकता नाहीं. आपले देशी खेळ सोडुन क्रिकेटच्या मागे लागणे मुळीच योग्य नाही. ’

‘ कोण हा रत्नाकर ? ’ ललितेने विचारले.

‘ कोणी विल्सन कॉलेजातला आहे म्हणे विद्यार्थी ’

ललितेने दुसऱ्या दिवशी चौकशी करून रत्नाकराची त्याच्या रुममध्ये गाठ घेतली. व त्याच्या खोलीतील एकदर टापटीप, त्याची स्वतः अदबीने बोलण्याची पद्धत, त्याची उच्च देहयष्टि हे पाहून तिच्या मनात त्याजविषयी प्रेम उद्‌भूत झाले.

‘ का आला होतात ? ’ त्याने विचारले

‘ काल तुमचे लेक्चर झाले ना ? मला तुमचीं मते पटली म्हणून मी आले आहे. मला स्वतःला क्रिकेटविषयी अत्यत तिटकारा आहे पण माझ्या बाबाना तितकेच क्रिकेटबद्दल प्रेम वाटतें. आणि म्हणून तुमच्या विरुद्ध बोलत नव्हता का, त्या श्रीबरोबर माझा विवाह लावून देणार आहेत. श्री नेहमीं आला म्हणजे क्रिकेट, स्वतःची स्तुती या शिवाय काहीच बोलत नाहीं–परवाच तो मला म्हणाला ‘ आणखी एक महिन्याने आमच्या क्रिकेटच्या मॅचेस सुरू होतील. फायनलचे वेळी माझी टीम नक्की येणार त्यावेळीं मी तुला मॅच पहायला नेणारच आहे. व तुझ्या बाबानाही नेणार आहें. माझा खेळ पाहिलास कीं तुझीं माझ्या बद्दलची मतें फार बदलतील

व तू माझा तिरस्कार न करता मजवर प्रेम करू लागशील '

' माझ्या सर्व काहीं लक्षात आले–' रत्नाकर म्हणाला ' तुमच्या बाबांचें श्री बद्दल मत फिरवायचे एवढेंच ना ? ते मी करीन. शिवाय कालच्या डिबेटमध्यें तो मला बरेच अपशब्द बोलला त्याचाही पण वचपा मला काढायचाच आहे आणि यदा आपल्या टीमचा कॅप्टन होण्याचा प्रिन्सि-पॉलनीं मला आग्रह केला आहे तेव्हा वचपा काढणे मला कठीण नाही '

' खरेच माझ्याकरता तुम्ही हे कराल–' ललितेने आनदून विचारले.

' तुम्हाला खोटे वाटत असेल तर हे घ्या वचन ' त्यानें तिचा हात आपल्या हातात घेत म्हटलें. तिच्या अगावर रोमाच उभे राहिले.

' नको वचन, इतका काहीं माझा अविश्वास नाही ' त्याचा हात सोड-वून घेत ललिता म्हणाली, ' बरे जाते ह '

रत्नाकर किती वेळ तरी ती गेलेल्या वाटेकडे पहात होता.

फायनल मॅचचा दिवस वायुवेगाने जवळ येत होता. सगळ्याच्या अपे-क्षेप्रमाणे श्री व रत्नाकर या दोघाच्या टीम्स फायनलला आल्या. बाकीच्या कॉलेजातील टीम्स आपल्या यथातथाच होत्या. रत्नाकराची टीमसुद्धा श्रीच्या पक्षापुढे ' कोण्या झाडाचा पाला ' अशीच होती.

श्रीच्या टीममध्ये चागला खेळणारा असा श्रीच. तो जर कधीं बाद झाला तर बाकीचे गडी पटापट औट जात. व श्री जर चागला खेळला तर बाकीचे गडी चागले खेळत. उत्तम बोलरसुद्धा श्रीच.

एकच श्री हा ऑलराउड होता व त्यावर त्याच्या टीमचे भवितव्य अवलबून होते. मॅचमध्ये एक अपायर बाबासाहेब होते या बाबतीत श्री व रत्नाकर या दोघानींही खटपट केली असे लोक म्हणत होते.

मॅचच्या आदल्या दिवशीं एका वर्तमानपत्राचा खास बातमीदार श्रीची मुलाखत घेण्यास गेला. त्यास सागितले " माझ्या खेळण्याचें यश टिफिनवर अवलबून आहे. टिफिन करता मी घरून काहीही खाऊन जात नाहीं. टिफीन झोडल्यावर जो सतोष होतो त्यामुळे माझा खेळ फार जोरदार होतो '

त्यानें आपला वीक पॉइट सागितला. त्याला काय माहित मुलाखत

घेण्यास आलेला मनुष्य रत्नाकरचा मित्र आहे म्हणून !

दुसरे दिवशीं रत्नाकरनें टॉस जिंकून प्रथम बॅटिंग घेतले पण त्याची सर्व टीम लौकरच बाद झाली. त्या दिवशी श्रीकडील टिफिन होती.

रात्रीं बाबासाहेब ललितेला म्हणाले होते ' आता उद्या तू ये! श्री उद्या खेळेल. बाकी श्रीच्या टीमचा विजय ठरलेलाच आहे म्हणा '

टिफिनपर्यंत मॅचच्या दुसऱ्या दिवशीं कालचेच गडी खेळत होते. टिफिन टाइमची वेळ झाली तेव्हा त्यातील एकजण बाद झाला.

टिफिनटाइम नतर श्री खेळण्यास येणार होता. रत्नाकरच्या टीमची टिफिन होती आज.

सर्व लोक हॉलमध्ये जमल्यावर रत्नाकर वर्तमानपत्र उघडून म्हणाला " आज पजाबचे एक शीख पुढारी अच्युतानद याचा एका मुसलमानानें अमानुषपणें खून केला आहे तेव्हा—त्याचा मान राखण्यासाठीं आपण सर्वांनीं आजची टिफिन बद ठेवावी असे मला वाटतें. उद्या याबद्दल मी तुम्हाला पाहिजे तितकी टिफिन देईन. बाकी या बाबत आपल्या सगळयाच्या मतानेंच काय ते व्हावें ! "

सगळयाना ती बातमी नवीन होती. त्या मडळींत वर्तमानपत्रे वाचणारे क्रिकेटशिवाय काहींच वाचीत नसत.

मतें घेण्यात आलीं. रत्नाकरच्या बाजूचे त्याचे, तो धरून अकरा गडी दोघे इनवेटर्स व एक अपायर इतकेंजण होते. श्रीच्या बाजूचे दुसरे अपायर—म्हणजे बाबासाहेब, त्याचे अकरा गडीहि होते.

परतु दोन इनवेटर्स रत्नाकरच्या बाजूचे झाले. रत्नाकरच्या पैशानें आपले काम बेमालुम केलें. अर्थात त्या दिवशींची टिफिन बहुमतानें रद्द झाली.

त्यानतरचा खेळ पहाण्यासारखा होता. श्री हा शून्यात उडाला. सहजच बाकीची टीमही लौकरच उडाली. नतर रत्नाकरच्या लोकांनीं मात्र बराच स्कोअर केला. श्रीनें बोलिंगही हास्यास्पद केले. एकदा स्टप व बाबासाहेब याचा अर्थाअर्थी सबध नसता श्रीच्या बॉलने बाबासाहेबाचा पाय जखमी झाला.

रत्नाकरची टीम चागली खेळली. श्रीच्या टीमचा पराभव झाला.

दुसऱ्याच दिवशीं ललिता रत्नाकरचे रूमवर गेली. रत्नाकरनें सर्व हकीकत तिला सागितली. तेव्हा ती म्हणाली ' काल मॅच सपल्यापासून स्वारीनें आमच्या घरीं तोंडही दाखविलें नाहीं '

' बरें पण मी एक प्रश्न विचारू का तुला ? '

समजला बरे का प्रश्न ! पण बाबाना विचारलत तरी चालेल. त्याचें तुमच्या सारखेच मत झाले आहे आता क्रिकेटबद्दल.' ललितेनें त्याच्याकडे तिरक्या नजरेनें पहात हसत उत्तर केले.

माझी गोष्ट वाचून सपली न सपली तोंच गोपूमामा म्हणाले ' बाहेर मोटार सारखी हॉर्न वाजवित आहे कीं ! '

" होयका ! ही गोष्ट वाचण्याच्या तद्रींत माझ्या हें लक्षातच आलें नाहीं. हा पहा निघालोंच "

लघुकथा गोपूमामाच्या ताब्यात देऊन घाईघाईने मी मोटारीकडे रवाना झालो.

# यंत्राची हौस फिटली : : : १

पर्वतराव हे एक शेतकरी होते. त्याच्या शेतचा गोठा खिलारानी गजबजलेला होता. पडळीत बैलाची दाणावैरण, कधीं हळदीचीं पोती, केव्हा कापसाचीं खोतीं तर कधीं काद्याचा ढीग असा काही ना काहीं माल तुडुंब भरलेला असे. पर्वतरावाच्या गावामधील वाड्याची कोठारें व कणगी धान्याने नेहमीं गच्च असत. ते डाळीडुळीची वाढी–दिढीच्या रूपाने थोडीबहुत सावकारीहि करीत.

पण पर्वतरावानी सगळ्यात नावसकी कशानें कमावलीं असेल, तर ती त्याच्या पानमळ्यामुळे. तीन मोटाचे पाणी सतत या पानमळ्याला चालू असे. मोटेवरचे गडी, वेल बाधणारे, धारे धरणारे, पानें खुडणारे, अशीं निरनिराळया कामाकरिता किती तरी माणसें तेथे राबत होतीं व त्या पानमळ्याचें वैभव टिकवण्याला झटत होती. जवळच्या सोलापूर गावीं विडयाचीं पानें नेण्याकरिता पर्वतरावाना एक बैलगाडी मुद्दाम ठेवावी लागली होती. या पानमळयापायीं दर दिवशीं दहाबारा रुपयाची उलाढाल सहजा-

सहजीं होत असे.

सर्वांशींच पर्वतराव गोड वागत. त्याच्या स्वभावांत हट्टीपणाची झांक नसती, तर त्याच्यासारखा खरोखरच माणूस नव्हता. त्याच्या दुराग्रहीपणानें पर्वतरावाचे, प्रसगीं, त्याचा आता कर्तासवरता झालेला मुलगा छत्रपति, याच्याशींहि खटके उडत. म्हाताऱ्यानें केव्हाहि नमतें घेतलें नाहीं, अखेरीस मुलगाच पर्वतरावाच्या पड्याने घेई.

एकदा, बी. एजी. झालेल्या पर्वतरावाचा एक नातेवाईक त्याचा पान मळा बघायला आला होता. आपल्याला त्यातली विशेष माहिती, या जाणिवेनेंच त्यानें सर्व काही पाहिलें व नतर म्हटले, " पर्वतराव, तुम्ही मोटाऐवजी पपच का नाहीं पाण्याकरिता वापरीत ? त्या हत्तीसारख्या बैलाना रोजच खायला काय कमी लागत असेल का ? पपाला एक हजारभर रुपये लागतील, पण काय फक्कड होईल."

पर्वतरावाने स्वतःच्या कुणबी भाषेत बरेच आढेवेढे घेतले, परतु ते सर्व फेटाळून लावले गेले व हळूहळू ही कल्पना पर्वतरावाच्या गळीं पूर्ण उतरली.

त्याच दिवशीं रात्रीं आपला मुलगा छत्रपति याजजवळ त्यानें मोटेऐवजीं पप लावण्याचें बोलणे काढलें.

त्यावर छत्रपति निक्षून म्हणाला, " आपण जे बैल लहानपणापासून जिवाच्या मोलान पोसले त्याना पारख व्हायच ही कल्पनाच मुळीं भयकर आहे. बैल विकले तर छत्रपति इथ पाणि प्यायला राह्यचा नाही. "

पण म्हाताऱ्याने पोराच्या धमकीची मुळीदेखील कदर बाळगली नाहीं. सोलापुरचा एक इजिनियर गाठून त्याने पप लावला व मोटेचे बैल एका गुजराला विकून टाकले.

तडफडत चडफडत छत्रपतीने गाव सोडलें. पण पुढें काय ? सोलापूर व पंढरपुरापलीकडे तो कुठेच हिंडला नव्हता—अजून कुणाचा चाकरमानी तो झाला नव्हता. एकवार त्याच्या मनात आलें, ज्या गुजरानें आपले बैल विकत घेतले त्याच्याचकडे नोकर म्हणून रहावें म्हणजे आपला सोम्या' रसाळ्या. . . . सगळे सगळे दिलाचे सोबती पुन्हा आपल्याला कुरवाळा-

यला मिळतील. तथापि ही बाब शक्य कोटींतली नव्हती. त्या गुजराचा पत्तासुद्धा छत्रपतीला माहित नव्हता.

अखेरीस त्याने पढरपुरच्या पाडुरगासच शरण जाण्याचें ठरवले. त्याचे पाय पढपुराकडे वळले.

कर्मधर्मसयोग असा कीं, तिथें छत्रपतीला त्याच्याच गावचा एक इसम भेटला. हा मुबईस गिरणीमध्ये एक मजूर होता. वर्षाकाठीं एक वेळ पढरीस येण्याचा त्याचा नियम होता व म्हणून तो मुद्दाम सवड काढून आला होता. त्या इसमाने छत्रपतीला मुबईच्या गिरणींत कुठे तरी गुदरून देण्याचे आश्वासन दिले व दोघेहि मुबईस गेले.

काहीं काळ छत्रपति आपल्या सवगड्याच्याच घरीं होता.

नतर त्याने दूर एका चाळीत खोली घेतली व दुसऱ्याच गिरणींत तो कामाला जाऊ लागला.

या चाळीच्या वातावरणात छत्रपति लवकरच रमला. जोत्याजी हे तेथील एक पुढारी होते. ते माळकरी असून चाळींत जीं भजनें वारवार होत त्याचें मुख्य सूत्रधार जोत्याजीच होते. ही भजनी मडळी तुळशीच्या माळा घालीत. एकदा माळकरी झालें, कीं दारूस शिवायचें नाही असा कडक कायदा होता. वयस्कर जोत्याजीची प्रथमपासूनच छत्रपतीवर लोभस नजर होती. छत्रपति आता माळकरी बनला होता. जोत्याजीइतक्याच उत्साहाने भजनाच्या दगलींत तो भाग घेई.

परतु याबरोबरच घडणारी एक गोष्ट पहिले काहीं महिने कोणाच्याच ध्यानीं आलीं नाहीं. ती म्हणजे जोत्याजीची तरुण मुलगी गौतमा हिचा व छत्रपतीचा वाढता परिचय. गौतमा स्वरूपवान् होती, अगदीं कोणाचीहि दृष्टि सहज वेधेल अशी होती, व असल्या मुलीचे जोत्याजीनें अद्याप लग्न का केलें नाही हा एक छत्रपतीच्या मनात सदान्‌कदा उद्‌भवणारा प्रश्न होता.

पण एक दिवस त्याचा उलगडा झाला. गप्पा निघता निघता जोत्याजी म्हणाला, " आमचीं गौतमा कमनशिबी, लग्न करून सुख नाहीं. नवऱ्यान परत धाडली व त्याचे आईबाप म्हणाले, ' आम्ही पोराच दुसर लगीन लावतों. वाटल्यास गौतमेला पोटगी देतों परतु आम्हाला ही सून नको.'

कारण काय तर नवऱ्यापेक्षा गौतमा वीतभर उच आहे, त्यामुळें लोक नांव ठेवतात. मी गौतमेचा विवाह लहाणपणीं उरकला तेव्हा नवराबायको बेतासबात दिसत होतीं. जावई अगान किरकोळच होता तरी पैसा रगड आहे, आज त्याच क्रॉफर्ड मार्केडमध्यें फळाच दुकान जोरात आहे. तो शरीरान फाटकाच राहिला. शिवाय तुझ्यापेक्षा तो किती ठेंगू ! माझी पोरगीं मात्र वयोमानाप्रमाणें उफडयाला आली, नवऱ्याप्रमाणे तिची वाढ खुटली नाहीं. आता गौतमेचा विवाह मी पैसे मोजायला कबूल असून देखील जमेना. म्हणतात नवऱ्यानें टाकलेली—दैव आपल न् काय ?" म्हाताऱ्यानें एक मोठा सुस्कारा टाकला.

अगोदरच, जोत्याजीची गौतमा, घरीं काहीं गोडधड केले तर क्वचित् प्रसगीं आईचा रोष सहन करूनहि, गिरणीमध्ये जोत्याजीबरोबर छत्रपतींस शिदोरी नेत असे.

असे सहा सात महिने चालले होते. छत्रपतीला आतां मात्र राहवेना. त्याने गौतमेच्या हृदयाचा ठाव घेण्याचा निश्चय केला.

एक दिवस गौतमा, सध्याकाळची, कायसेसे खाण्याचे त्याच्याकरिता घेऊन आली असताना तो म्हणाला, " गौतमा, मी सध्या दुसऱ्या गिरणींत नोकरी बघतो आहे. ही चाळदेखील लौकरच सोडणार आहे मी."

" का, तुमच्यासारखीं नेकीन काम करणारीं माणस मालकाला नको झालीं काय ? "

"तस नाहीं. मीच ती नोकरी सोडीन म्हणतो,म्हणजे ही गिरणीनजीकची चाळ आपोआपच सुटेल. चाकरी टाकली नाहीं, तरी एकादी लांबची चाळ तरी मी पकडणारच."

" आमचा कटाळा आला वाटत ? "

" गौतमा, तू रोज माझीं बारीक सारीक काम पार पाडू लागलीस, तर तुझ्यावाचून माझ सर्वच अडेल एकाद दिवस. मला एकटयाला सर्व काहीं करायची नको का सवय ? समज, एक रोज तुझीन् माझी ताटा-तूट झाली..."

" पण पण..." गौतमा अडखळली. चोरटया दृष्टीनें ती छत्रपतीकडे

पाहत होती.

" गौतमा, तुझा सहवास सतत लाभण्याइतका आहे का मी भाग्यवान्? बोल, विचारू मी जोत्याजीला ? नाहीं तर मी विचारीन आणि तू झिडकारून लावशील..."

" तर तर...मला वेडच लागल आहे जस ?..."

गौतमेनें लाजत लाजत हे शब्द कसेबसे उच्चारले व छत्रपतीकडे एकवार कटाक्ष फेकून ती तेथून पळाली.

मग छत्रपतीनें जोत्याजीजवळ गौतमेला मागणीं घालण्याचा धीर केला. आजपर्यंत आपण गिरणी-कामगार का झालो ती हकीकत त्यानें कुणालाच सागितली नव्हती. जोत्याजीला त्यानें आता सर्व निवेदन केले व स्वत:च्या शेतीवाडीची त्याला खबर दिली.

म्हातारा आनदाने नुसता बहरून गेला होता. तो म्हणाला, "छत्रपति, किती उपकारी केलस तू मला. नाहीं तरी माझी एवढीच एक पोर. तिच्या प्रपचाच्या चिध्या झालेल्या पाहून मी रोज व्याकुळ होत होतो. इथून दसरा व दिवाळी काहीं फार दूर नाहीं. हे सण गेले की, माहींत कार्य उरकू. तुझ्या बापाचा मला पत्ता दे. त्याला मी हजार रुपयापर्यंत पैसेहि द्यायला नेतों व एकदा सगळ नक्की करून टाकतों. त्याचा मजवर विश्वास बसायचा नाहीं. म्हणून मी पैशाची पुरचुडी सागाती घेऊन जातो. आपल्यात पोरीचे पैसे घ्यावे ही चाल. माझी मुलगी आहे एकदा लग्न झालेली! गिरणीची नोकरी ही आम्हा नवराबायकोच्या ससाराला पुरेशी आहे. तुझ गाव पढरपुराकडेच आहे म्हणतोस तर येताना पाडुरगाच दर्शनहि घेऊन येईन."

* * *

छत्रपति निघून गेल्यावर काही दिवस पर्वतरावानें त्याचीं फारशी आठवण काढलीं नाहीं. तो पुन्हा परत येईल, चुकलेला वाटसरू केव्हां तरी मार्गावर येणारच असा त्याचा ठाम कयास होता.

शिवाय विहिरीवरील लावलेल्या पपातहि म्हातारा गुतला होता. गांवचे अडाणी नांगऱ्ये त्याच्या कर्तबगारीची स्तुति गात होते. त्यांतच पर्वतरा-

याचा सारा हर्ष साठवला गेला होता.

पण त्या पपाची खरी एकालाहि माहिती नव्हती. यत्रास ठायीं ठायीं तेल दिलें कीं झाले, असाच पर्वतरावाचा समज होता. इजिनियरनें बसवलेल्या यत्राचे सामान पैसे खर्च झालेल्या मानाने सरसनीरस कितपत आहे याची पारख पर्वतरावाच्या बी. एजी. झालेल्या नातलगासहि नव्हती; मग पर्वतरावाला कुठून असणार ?

महिन्याभरानें एक दिवस पप एकाएकी बद पडला. विहिरीवर त्या वेळी मोटा नव्हत्याच. पूर्वी नागवेलीच्या वाफ्यास पाणी देणारी पचवीस घागरीची एक एक मोट या समयास अडगळ होऊन कुठे तरी लोळत होती.

पाणी बद झालें, तर पानमळयाला नुकसान पोंचणार होते. पर्वतरावाला बाकीची हजार कामे बाजूला सारून सोलापुरास जावे लागलें.

इजिनियरच्या मागे इतर उद्योग होते. काहीं विशेष पैका दिल्याशिवाय अर्थातच तो यायला तयार नव्हता. पर्वतरावाची दुसऱ्या कोणा इजिनियरशीं ओळख नसल्याकारणानें तो मागेल ते देऊन पर्वतरावाने यत्र दुरुस्त करून घेतले.

पण असे जेव्हा वारवार होऊ लागले तेव्हा म्हातारा चिडला. आपण फसलो व किफायत म्हणून लोखड पदरात घेतले असे पर्वतराव उघड-उघड बोलू लागला.

या हकीकतीला पाच-सहा महिने झाले. फिरून यत्र बद पडलें. पुन्हा मानमरातबानें इजिनियर आणला. त्याने या वेळीं सागितलें. "यत्राचा एक पार्ट बिघडला आहे, मुबईशिवाय इतरत्र मिळायचा नाहीं. मी तुम्हास चिठी देतो, तुम्ही तो समक्ष जाऊन घेऊन या. जरा किमतीचा मामला आहे तेव्हा प्रत्यक्ष गेलेल बर. मी आजच मुबईस जात आहें तिथ तुम्ही मला ताजमहाल हॉटेलमधे भेटलात, तर आपण बरोबर जाऊन जिन्नस खरेदी करू."

पर्वतरावाला नाहीं म्हणायची सोय नव्हती. इजिनियरच्या म्हणण्याप्रमाणें आठ दिवसात तो मुबईस निघणार होता.

पण दुसऱ्याच दिवशीं जोत्याजी पर्वतरावाचा शोध घेत त्याच्या वाड्यांत

शिरला. पर्वतरावानें त्याची वास्तपुस्त केली.

जोत्याजी छत्रपतीच्या विचारानें आला आहे हें कळल्यावर पर्वतराव खूपच आनदला. त्यानें छत्रपतीशीं आपण उगीच तेढीनें कसें वागलों तें सागितले व जोत्याजीला आपल्या पानमळ्याची दारुण स्थितीहि नेऊन दाखविली.

विहिरीवर यत्र पाहून जोत्याजी बोलला, " आम्ही गिरणी-मजूर म्हणत असतो रानात सुख आहे, कारण नेहमींच देवाच्या मन्निध राहिल्यासमान वाटत. गुर, झाड, जिवत पाणी ! सारच नैसर्गिक ! कृत्रिम काहींच नाहीं !! पण इथहि यत्राच रावणराज्य सुरू झाल तर ! "

पर्वतराव यावर स्तब्धच राहिला.

दुपारचीं जेवणे उरकल्यावर जोत्याजीनें मुख्य विषय काढला. आपल्या कशाचे हजार रुपयेहि त्यानें पर्वतरावाला दाखवले.

पण पर्वतराव जोत्याजीला नक्की कोणतेच सागेना. मुलीचें अगोदर लग्न झालें आहे हें ऐकून तो मनात थोडा कचरला होता. तो म्हणाला, ' आपण दोघेहि मुबईस जाऊ व नतर काय तें ठरवू. "

मग जोत्याजीला तिथे दम निघेना तो किंचित् निराश झाला होता. तो म्हणाला ' मी पढरपुरीं जातो. बरोबर चौथ्या दिवशीं याच वेळेला कुर्डूवाडी स्टेशनवर तुमची वाट पाहीन. तिथून आपण सगतीनच जाऊ."

जोत्याजी पढरपुरास निघाला.

* * *

पर्वतराव आगगाडीतून उतरताक्षणींच त्याची व जोत्याजीची गाठ-पडली. पण जोत्याजी त्यास म्हणाला, " तुमची खोटी होऊ नये म्हणून मी आलों. मला दुसर काम आहे. तुम्ही मुबईस एकटेच निघा. मला थोडा अवधि लागेल—"

" का ? " पर्वतरावानें विचारले.

" मी पंढरपुरीं गेलों, तो बाजारचाच दिवस होता. गुरांच्या बाजारात आठ बैल विकायला आले होते. एक कसाई घेत होता ते. केवळ जास्त किंमत येते एवढ्यासाठींच मालक ते विकायला तयार झाला होता. विक्री

करणारा एक गुजराथीं होता. माझ्यापाशीं हजार रुपये होतेच. शिवाय गौतमेच्या लग्नाबाबत मी निराश झालों होतों. बैल कसायाच्या हाती पड- लेले पाहवेनात तेव्हां ते घेऊन आलों. इथला बाजार गुरवारचा आहे त्यात कोणी शेतकऱ्यानें खरेदी केले तर पाहतों व नतर मुबईस येतों.”

पर्वतरावाच्यानें बैल पाहिल्याशिवाय राहवेना. तो जोत्याजीबरोबर गेला, आणि पाहतो तो त्याचेच ते आठहि बैल होतें.

पर्वतरावाला बघितल्यावर जेव्हा ते हबरले तेव्हा तर तो देहभान पार विसरला व जोत्याजीला म्हणाला, “ जोत्याजी, या घटकेला तुम्ही मुबईस जा, छत्रपतीला आणि तुमच्या कुटुबाला घेऊन या. दिवाळी माझ्या घरींच साजरी होऊ दे. नतर माहींत धडाक्याने कार्य करू.”

जोत्याजीला याचा अर्थच कळेना. पण पर्वतरावाने विवाहाला समति दिली या बातमीनेच तो इतका हर्षला कीं, त्याने छत्रपतीस गौतमेला व तिच्या आईला घेऊन येण्याबद्दल तारच केली.

ही कामगिरी करून आल्यावर त्याला सगळा उलगडा हलके हलके झाला.

* * *

तार पोचल्याबरोबर छत्रपति व गौतमा निघून आलीं. सध्यापुरती गौतमाची आई मुबईसच असलेल्या तिच्या माहेरी गेली होतीं.

एका आठवड्यातच पर्वतरावाचें शेत पूर्व स्थितीवर आले. पानम- ळ्याच्या विहिरीवरचा पप त्याने जाईल त्या किमतीला विकून टाकला होता.

## भांडवलशाहीचा बळी : : : १०

कायको निवर्तली तसें वासुदेवरावाचे घरातील लक्ष साफ उडालें. आपल्याला दोन मुले आहेत, आपली आई अद्याप हयात आहे, याचा त्याना विसर पडला. कुठल्यागा स्टुडिओंत असलेली स्टेज मॅनेजरची नोकरी त्यानीं लाथाडून यात्रेला जाण्याच्या इराद्यानें मुबई सोडली.

वासुदेवरावाच्या आईलाही सुनेबद्दल काहीं कमी वाईट वाटलें नाहीं. ती माउलीच तशी होती. वासुदेवराव असा तिरकट तारू ! चाकरी कायमची नाहीं. दहा बारा नाटकमडळयात व्यवस्थापक म्हणून होता. तथापि एकाहि कपनींत धड बस्तान बसले नाहीं. मध्यतरी लाबलाबचे सुरेल गवई आणून त्याचे जलसे त्यानें मुबईंत करवले. किरकोळ शिरकोळ नाना भानगडी केल्या. केव्हा पैसा खूपसा मिळाला तर केव्हा खोट बसली. सरतेशेवटीं एका फिल्मकपनींत अवघ्या दहा बारा रुपयावर स्टेज मॅनेजर म्हणून काम करणें आले. अशा धादलीच्या प्रपचात वासुदेवरावाची पत्नी पूर्ण शात होती. पतीला काहींही कमी पडू देत नव्हती. मुलांना कसली कमतरता

भासू नये याकरता ती काळजी घेत होती. सासूचेही सर्व प्रकारानें जेथल्या तेथे होत असे.

बाहेर चैनी व चारगट लोकात ऊठबस बसणारे वासुदेवराव घरीं आपल्या तोंडातून एकही शब्द वावगा न जाईल अशी खबरदारी बाळगत मुलाच्या समोर अचकट विचकट बोलण्याने तीं बिघडतात असे त्याच्या पत्नीचे मत होते. हेचसे काय पण अशी कित्येक मते केवळ बायकोची अतएव ती वासुदेवरावानाही पटत. स्वरूप व गुण याचा फारकरून न आढळणारा एकोपा त्याच्या अर्धांगीच्या ठायीं होता, परतु वासुदेवरावाच्या कुटुबातल्या सर्वांच्याच प्राक्तनानें दगा दिला असे म्हणायला हरकत नाही. एरवीं काहीशा तरुण वयात फक्त साध्या तापाचें निमित्त होऊन माणूस आटपले तर त्याचे स्पष्टीकरण कोण आणि कसे करणार?

पत्नीच्या निधनानतर स्वतःच्या मुलाचे शिक्षणाची कोणतीच तरतूद न करता डोक्यात राख घालून तीर्थ—यात्रा करीत हिंडणें म्हणजे चमत्कारिक स्वभावाची कमाल होती. शेजाऱ्या पाजाऱ्यानी आश्चर्य प्रगट केले, पण वासुदेवरावाच्या आईला तो अचब्याचा विषय वाटत नव्हता. मुलाच्या तऱ्हेवाईकपणाचे मासले त्याचा जन्म झाल्यापासून ती देखत होती. पोटच्या गोळयासबधीची तिने कधींच आशा सोडली होती. आपल्या नातवडावरच सध्या तिची सारी मदार होत.

गौरी ही इग्रजी सातवींत होती व तिचा धाकटा भाऊ दत्तू इलिश सहाव्या इयत्तेत होता. दोघानीही नाइलाजाने विद्याभ्यासास रजा दिली.

आजीने दुसऱ्याच्या घरी स्वयपाकपाणी पत्करले. थोडे थोडे शिवणकाम गौरीला येत होते. त्याची तिने कास धरली. दत्तूला शाळा सोडताना डॉइगच्या परीक्षा यापुढे देता येणार नाहीत याबद्दलच जास्त वाईट वाटले होते. आजपर्यंत तो चित्रकलेतील दोन महत्त्वाच्या परीक्षा पास झाला होता व याचाच नोकरी मिळविण्याच्या कामी उपयोग करावा असे त्याने ठरवले. दत्तू सर्टिफिकिटे खिशात बाळगून हिडू लागला.

इतक्यात वासुदेवरावाची यात्रेची खुमखुम तीन दिवस कडकडीत उपास पडल्याकारणानें जिरून त्याचे परत आगमन झाले. या चक्रम् व्यक्तीनें

आपल्या पुढील भगड कार्यक्रमात दत्तूवर एक किंचित्सा उपकार करून ठेवला. दत्तूला एका स्टूडिओत चित्रकाराची नोकरी लावून दिली.

परतु त्यानतर एकूण सात फिल्मकपन्यामध्यें दत्तूच्या अल्पायुषी चाकऱ्या झाल्या. कुठे धनिक व्यक्तींचे वशिल्याचे लोक असल्यामुळें तर कुठे चित्रपट न चालून कपन्याच बद पडल्या म्हणून दत्तू कामधद्याला पारखा झाला होता.

प्रतापरावाच्या स्टुडिओंत जेव्हा दत्तू गेला तेव्हा इतर पाच अर्जदार त्याच्या आधीं हजर होते. प्रतापरावानीं मग प्रत्येकाला स्वत:चा एक फोटो दाखवून त्याचें खूप मोठें एन्लार्जमेंट करण्यास सागितले. दत्तूनें बजावलेल्या कामगिरीवर ते इतके खूष झाले कीं, त्यानीं ऑफिसमध्यें आपले दत्तूनें काढलेलें चित्र ताबडतोब लावले व दत्तूस जवळ जवळ कायम स्वरूपाची चाकरी दिली.

दत्तू ज्या कपनींत कामाला होता तिचे चित्रपट भराभर बाहेर पडत होते. साहजिकच नोकर लोक जीव उगाळून कष्टत होते. दत्तूला कधीं कधीं सोळा तास देखील राबावे लागे. महिन्याकाठीं हातीं येणाऱ्या वीस रुपयावर नजर देऊन हे सर्व तो निमूट करीत होता.

पण तीन चार महिने झाल्यानतर पगारही वेळेवर मिळेनासा झाला. मालकाला पुष्कळ अडचणी सागितल्या तर मालक आपलेही अडथळे प्रत्युत्तरादाखल निवेदित असे. वादच घालायचा म्हटलें तर दत्तू प्रतापरावांस केव्हाच निरुत्तर करू शकला असता; पण दत्तूला जसे मागचें साठलेलें वेतन मिळवायचें होतें तसेंच त्यास स्वत:चा कामधदाही कायम ठेवणें जरुरीचें होतें.

कारण सगळ्याच स्टुडिओंतील परिस्थिती दिवसेंदिवस बिकट होत आहे हे तो बघत होता. जिकडे तिकडे नटींची भावभगत वाढत होती आणि तितक्याच प्रमाणात चित्रपट तयार करणाऱ्या इतरेजनांचें महत्त्व कमी होत होतें. मालकाला कामकऱ्याच्या हलाखीकडे पहावयाला फुरसत नव्हती. त्यातून एखाद्याकडे लक्ष पुरविण्यात आलेंच तर त्याचें वाटोळें होईल अशीच योजना बहुतकरून आखली जात असे. मालकमडळींचा सारा वेळ

मुख्य नटींची चूळ झेलण्यात अडला गेला होता. अभिनयनेत्रींचे पगार एकसारखे वाढत होते. इतकेंच नव्हे तर पुढच्या महिन्याची रक्कम त्याना आगाऊ देण्याची व्यवस्था केली जात होती व दत्तूसारख्याना नुसती पैशाचीं आश्वासनें देऊन वाटेला लावण्यात येत होते. अशा स्थितींत पोटा-पाण्याची व्यवस्था करणें त्याना अत्यत जड जात होतें. पाण्यावाचून मासा तडफडतो अगदीं तसाच दरएक इसम पैशाशिवाय कासावीस झाला होता.

यात भरीला भर म्हणून वासुदेवरावाचे नवीन नवीन उपद्व्याप दत्तूला सतावून सोडीत होतेच. त्यांच्या सुपीक डोक्यातून अलीकडे एक कल्पना उदय पावली. त्याचें म्हणणें असें पडले कीं, गौरीचे नाकडोळे चांगले आहेत तेव्हा ती नटी बनण्यास योग्य आहे. अनायासेच खोऱ्यावारी द्रव्य घरात येईल.

वासुदेवरावानीं आपल्या आईला व उभयतां मुलाना हा बेत एक-दमच ऐकवला.

आजी कांहींच बोलली नाहीं. गौरीही स्तब्ध राहिली. मात्र दत्तू म्हणाला, "मी असें ठासून सागतों की, मी स्टुडिओंतील सर्व उडत्या मैनाच्या आयुष्याचें निरीक्षण केलें आहे. चित्रपटचद्रिकाचे कामोत्तेजक हावभाव अभिनयापुरतेच मर्यादित नाहींत. जिकडून तिकडून पैसे वाजताहेत अशा स्थितींत या नटींचा लक्ष्मीधराशीं सलोखा वरवरचाच आहे असें म्हणवत नाहीं. पुढें काय होईल हें सागता येत नाहीं; पण आजच्या घटकेला अब्रू-दार तरुणींनीं प्रवेश करण्याजोगा तो धदा नाहीं. आमच्या कंपनींत सुद्धा ते बेळगावहून देखण्या बायका आणवतात, त्याना मोहक नावें देतात, अशा अभिधानाच्या मागे 'मिस्' हा शब्द बुद्धिपुरस्सर लावतात......"

"दत्तू, कांहीं म्हण, मला गौरीच्या बाबतींत खात्री आहे. नसती थेरे करणाऱ्या मुली त्या वेगळ्याच."

हे वासुदेवरावाचे विचार त्याच्या आईलाही मानवले नाहींत. गौरीच्या मनात आलें कीं, कुटुंबाच्या मिळकतीला आपला मोठा उपयोग होण्या-सारखा असला तर आपण नटी होण्याची तयारी दर्शवावी. नैसर्गिक उच्छृंखलतेवर ताबा चालवण्यास तिचें मन सिद्ध होतें.

तशी ग्वाही तिनें दत्तूची एकीकडे गाठ घेऊन त्यास दिली; परतु तिचा भाऊ विषाची प्रचिति बघणारच नव्हता.

या कटकटीतून निसटण्यास गौरीचा विवाह करणे हा एकच मार्ग दत्तूला दिसला. त्याने अविश्रांत श्रम घेऊन वरसशोधन सुरू केले.

आफ्रिकेतील एक तरुण हिंदी मनुष्य काही दिवसाची रजा काढून मुंबईत आला होता. त्यास लग्न करूनच परत जायचे होते. चारशें रुपये पगाराचें घवघवीत ठिकाण असल्यानें ब-याच थोरामोठ्याच्या मुली सागून येत होत्या. या स्थळासाठी दत्तूने जे प्रयत्न केले ते सफळ झाले. गौरीची वरानें निवड केली. विवाह झाला. गौरीनें पतीसमवेत आफ्रिकेस प्रयाण केले.

या मोठ्या व्यापाखेरीज लहानसहान प्रकरणे रोज उद्भवत. वासुदेवराव सकाळ ते सध्याकाळपर्यंत ज्या ज्या उचापती करीत त्या बहुतेक अगाशीं आणीत. काही फायदा गवसलाच तर त्यात त्याच्या सिगारेटचाही खर्च भागत नव्हता.

दत्तूची आजी अद्याप दुसरीकडे स्वयपाकाला जातच होती.

कपनीतील दत्तूचा पगार साठता साठता पाचशे रुपये जमले. एकरकमेनें पैका येईल यातच दत्तू समाधान मानू लागला.

तथापि एक दिवस अघटितच उगवला. स्टुडिओमधील निम्मा स्टाफ कमी करण्यात आला. त्यात दत्तूचे नाव होते.

भीडभाड बाजूला सारून बोलण्याचा काळ प्राप्त झाला. दत्तूने तडक फिल्म कपनीचे मालक प्रतापराव याची गाठ घेतली.

बरीच बोलाचाली होऊन दत्तूच्या पगाराची बाकी पाचशे रुपयापोतर साठली असल्याचे कबूल करण्यात आले.

प्रतापरावानी दत्तूला स्वत:ची उन्नति करण्याचा एक नवीनच रस्ता सुचवला. ऑफिसातील आपल्या भव्य तसबिरीकडे अगुलिनिर्देश करून ते म्हणाले "हें चित्र तुझ्याच हातचे याची मला जाणीव आहे. इतक्या कुशल कसबाचा मनुष्य फक्त पोस्टर्स रगवतो, टायटल्स काढतो हे मला पसत नाहीं. दत्तू तू फोटोग्राफर हो. कॅमेरामन म्हणून कोणच्याही कपनींत पाच पाचशें पगार मिळव. इथे उमेदवार रहा. आता थोडा त्रास सोसावा

लागेल. अडीच हजार रुपये डिपॉझिट ठेवणें भाग येईल. ऊः याचें काय? तू होतकरू आहेस. पाचशें रुपये आहेतच तुझ्या पगाराचे मजजवळ! आणखी दोन हजार रुपये घेऊन ये कीं फत्ते काम!'

'आपण मी रेखाटलेल्या चित्राचें स्मरण ठेवता, माझ्यावर मेहेरनजर करता, मी गरीब आहें—फुकटच शिक्षण मिळेल तर...'

'छेः छेः, जोखमदारी आहे. भारी किमतीच्या यत्रांशीं नवख्यानें खेळावयाचे आहे. येवढी अनामत रक्कम पाहिजेच. जन्माचे कोटकल्याण होईल. वीस एके वीसचा पाढा कायमचा चुकेल. डिपॉझिटचे पैसे काय लहर लागेल तेव्हा माघारीं घेता येतील.'

'बरें बघतो जमल्यास' दत्तूची महत्त्वाकाक्षा डिवचली गेली होती. त्याला पैसे हातीं आणण्याची अधुक शक्यता दिसली. एवढ्याचकरिता तो असे म्हणाला.

त्यानें आफ्रिकेस पत्र टाकले, गौरीला मनोदय कळवून दोन हजाराची मागणी केली व पैसे लौकरच माघारी करण्याची हमी पत्करली.

दोन हजार रुपये ताब्यात आले. दत्तू आनदला. त्याची आजीही हर्षभरित झाली. वासुदेवराव बायको गेल्याचा अजून खेद करीतच होते.

दत्तू फोटोग्राफी शिकण्याच्या हेतूने स्टुडिओत फेऱ्या मारू लागला.

दिवसावर दिवस लोटत होते. दत्तूची ईर्षा हलके हलके मावळू लागली. जो तो कॅमेरामन आपल्याच कामात चूर होता. जणू काहीं दत्तूची गड्याऐवजींच योजना झाली होती! फोटोग्राफींतील ढोबळ गोष्टी देखील न समजता इकडून तिकडे शूटिंगसाठीं यत्राचे पेटारे वहाणे हाच दत्तूचा दिनक्रम ठरून गेला होता. कोणती बाब विचारायला गेले तर कॅमेरामन वसकन धावून येत.

अशी वागणूक प्रतापरावाच्या आदेशानुसारच जाणूनबुजून होत असावी अशी कल्पना ज्या क्षणीं त्याच्या मनांत आली त्याच क्षणाला डिपॉझिट परत घेण्याचा दत्तूचा निश्चय झाला.

तो प्रतापरावाच्या ऑफिसमध्यें ते एकटेच बसलेले असता त्यांना भेटला

व एकसमयावच्छेदानें अन्याय त्याजपुढें माडून डिपॉझिट देण्यास त्याने सांगितले.

प्रतापरावाची अळटळ स्पष्ट दिसू लागली तेव्हा दत्तू चिडून म्हणाला, 'तुमचा डोंबिवलीला चाळीस हजाराचा बंगला नुक्ताच पूर्ण झाला, खेरीज मुलगा होलिवूडमध्ये सिनेमाशास्त्र शिकायला ठेवला आहातच......'

'मग या खाजगीं गोष्टींशीं तुला काय करायचेय......'

'मला माझे पचवीसशें रुपये या मिनिटाला टाका. फोटोग्राफीमध्ये तज्ज्ञ करतो, असे सांगून मला यत्राच्या ट्रका न्यायला, आणायला लावल्यात बस्स् झाला फिल्म कंपन्याशीं परिचय–चला द्या डिपॉझिट......'

'कुणाचे पैसे अन् कोणी घेतले ? माझ्या यत्राची वहातूक करताना ती मोडलीस त्याचें काय ? असल्या तुझ्या वर्तणुकीने मला अडीच हजा-राचेवर नुकसान पोचले. विचार हवे तर कोणच्याही कॅमेरामनला......'

'प्रतापराव,' दत्तू आपण काढलेल्या त्याच्या चित्राकडे बोट दाखवून म्हणाला '–हा एन्लार्जड फोटो मी केला त्या वेळचा तुमचा माझ्यावरील लोभ आठवा. कुभाडें रचू नका. फार दिवस मुळींच दमडी न घेता व कधीं अर्धामुर्धा रोजमुरा घेऊन मी राबलों. वर्षाच्या चोवीस एकादशा एकदम पार पाडल्या व तुमच्याकडे काम केले. मोठ्या पगाराची लालूच दाखवून चुचकारलेंत......बहिणीकडून दोन हजार रुपये उसनवार काढले......'

'कोण आहे रे, द्या याला गचांडी, फाटकापासल्या पठाणाला म्हणावे पुन्हा आंत पाऊल टाकू देऊ नको...' प्रतारावराव टेबलावरील घटा जोरानें वाजवू लागले.

'गळे कापू...डबोलें गिळकृत केलेंस...गरिबाचा काळ...' दत्तू दात–ओठ खात प्रतापरावाचे अंगावर गेला, पण...

त्याच वेळीं जवळपासची मंडळी गोळा झाली व दत्तूला धक्के देऊन बाहेर हाकलण्यांत आलें.

  

पुढें दत्तूनें रंगाऱ्याचें काम केलें. सटरफटर उद्योग करण्यासाठीं त्यानें

हाताखालीं माणसे ठेवलीं व मोठमोठया इमारतींचीं नक्षीकामे तो जातीनें करू लागला. त्याच्या हुन्नराची बिल्डिंगचे मालक स्तुति करीत; परंतु मोबदला देण्याचे वेळीं हेंच लोक हात आंखडता घेत. तरीपण एकंदरींत पैशाचे मान बरें पडत असें. दत्तूनें मामुली कामाकरितां जे नोकर बाळगले त्याची तो केव्हाही गैरसोय होऊं देत नसे.

द्रव्य थोडेफार खिशात येऊं लागले तरी गौरीकडून घेतलेले दोन हजार रुपये माघारी करण्याची जबाबदारी दत्तूच्या शिरावर होतीच. इतकें मात्र खरें कीं दत्तूच्या आजीस कित्येक वर्षांच्या ओढाताणीच्या आयुःक्रमानंतर पुन्हा एकदा निवातपणा प्राप्त झाला. दत्तूच्या वडिलानाही दोन प्रहरीं पोटभर जेवण बिनतक्रार मिळू लागले.

गौरीचीं दत्तूला आफ्रिकेहून खुशालीचीं पत्रे येत. दत्तूचीही उत्तराची हाक जात असे. आपल्या बहिणीला खऱ्याखुऱ्या हकीगती त्यानें केव्हाच कळवल्या नाहींत. उगीच तिने दुःखी होऊ नये अशी त्याची मनीषा होती.

आजीनें दत्तूचें लग्न करण्याचा आग्रह धरला, पण गौरीची उसनवारी फेडणें हें एकच चालू काळात त्याचे ध्येय होतें.

बरींच वर्षें झालीं. दत्तू विशेष प्रख्यातीस चढला होता. सर्व हौशी श्रीमंत ही दत्तूचीं गिऱ्हाइके होतीं. याचाच परिणाम म्हणजे दत्तूचें कर्ज जवळ जवळ सरतच आलें होतें.

एकदा डोंबिवलींतील एका मोठ्या बंगल्याचा दिवाणखाना सुशोभित करण्याची कामगिरी त्याला मिळाली. बंगल्यातील प्रत्येक व्यक्तीनें दत्तूचें नक्षीकाम पाहून त्यास धन्यवाद दिलें.

मालक तर अत्यंत संतोषला. त्यानें त्या दिवाणखान्यात एक छोटासा समारंभ व्हावयाचा होता, त्यास कित्येक बडेबडे इसम बोलवले होते; दत्तूलाही मालकानें निमंत्रण देऊन त्याचा बहुमान केला.

एका तसबिरीचें अनावरण करायचें होते. दत्तू आपला सर्वांत मागें बसून भपकेदार पोषाखात येणारे पाहुणे निरखीत होता.

समारंभास प्रारंभ झाला. मालकानें भाषणास सुरुवात केली.

दत्तूच्या कपाळावरची एक एक आठी वाढत होती व अखेरी जेव्हां

मालकानें भाषण संपवून फोटोचें अनावरण केले तेव्हा दत्तू ताड्कन उभा राहिला. ती प्रतापरावाची त्याने चितारलेली तसबीर होती. बाणासारखा हरएक शब्द त्याच्या तोंडातून सुटत होता. ' सब् झूट, आता जें गुणवर्णन करण्यात आले त्यातले अक्षर नि अक्षर खोटें. ही माझ्याच हातची तसबीर आहे. माझे अडीच हजार रुपये या नरपशूनें घशापार केले. मी व माझे सहकारी याना नोकरी करून देखील वेतन भेटले नाही. आमचें रक्तशोषण करून कंपनी जगत होती, हा प्रतापराव चैन करीत होता. नाचऱ्या नटींचा आषक बनला होता. असला मनुष्य मेला हेंच ठीक झाले. आमच्याच पैशावर हा चाळीस हजाराचा बंगला उभारला गेला आहे. होलिवुडात असल्याकारणाने प्रतापरावाच्या चिरंजीवाना या गोष्टी माहीत नसाव्यात असें......'

निमंत्रित पाहुणे कान टवकारून ऐकत होते. तिथे सर्वच उच्च वातावरणात फिरणारी जनता होती. तेव्हा ' गप्प बसा ' असे म्हणण्यापलीकडे दत्तूला त्यानीं प्रतिकार केला नाहीं. अखेरीस प्रतापरावाच्या मुलाने बंगल्यातील गड्याच्या मदतीनें दत्तूला पिटाळून लावले. मार्गस्थ होतांना देखील दत्तू बडबडत होता.

यानंतर तो नुसतेच विचारात दिवस घालवू लागला, परंतु असें किती वेळ चालणार ! चार पाच रोजातच घरचे तांदूळ सरल्याची वर्दी त्याच्या आजीने दिली.

नाइलाजानें दत्तू काहींशा भ्रमलेल्या मनस्थितींतच आजीचा व वडिलाचा निरोप घेऊन घराबाहेर पडला.

एका सातमजली चाळीचा पारशी मालक भिंतीचे रंगकाम व नक्षीकाम करून देण्याविषयीं दत्तूच्या अतिशय मागे लागला होता.

दत्तूनें आज मुद्दाम त्याच्याकडे जाऊन त्यास कामाला आरंभ करीत असल्याचें कळवलें.

दत्तू सातव्या मजल्यावर रंगसामान न घेतांच गेला.

जरा वेळानें एक छिन्नविच्छिन्न प्रेत रस्त्याच्या बाजूस आढळून आले. खाणाखुणा समजण्याइतकेंही तें शव धड स्थितींत नव्हतें.

× × ×

दत्तूच्या आजीनें नातवाचा अती शोध घेतला. पृथ्वीतलावर कांहींच तपास लागत नाहीं हें पाहून ती अधिक चौकशी करण्यास स्वर्गास रवाना झाली.

वासुदेवराव पोराचा एक एक गुण आठवून नेत्रातून आसवें गाळूं लागले, पण अशा शोकाला आता कोणीही फारशी किंमत दिली नसती.

* * *

दत्तूच्या अगमेहनतीचें हें असें चीज झाले. सोळा सोळा तास काम करणाऱ्या दत्तूच्या शरीराच्या ठिकऱ्यान् ठिकऱ्या उडाल्या. त्याच्याजवळ श्रमाचेच काय तें भाडवल होतें–पैशाचा गठ्ठा नव्हता. ईश्वरानें हा त्याचा दोष ठरवला आणि भाडवलशाहीनें दत्तूच्या दोन्ही बरगड्यात आपले खजीर खुपसले.

या ना त्या रीतीनें असल्या इतिहासाची रोजच्या रोज पुनरावृत्ति होत आहे तथापि कारणाचा व परिणामाचा कुणी विचारच करीत नाहीं.

# तिच्या मागचा त्रास : : : ११

दामूनें शकुंतला साठे हिला पाहिल्यापासून तिच्यावर इंप्रेशन मारण्याचे यत्न सुरू केले. त्याने तिची भेट घेऊन बोलण्याचेहि प्रसंग थोडे थोडके आणले नाहींत ! पण ती त्यास हेतुपूर्वक टाळीत असे. त्याचे नेहमीं आपल्या भोंवती फिरणे, आपण कुठेहि सभेस गेलो तरी त्या ठिकाणीं नेमकें हजर असणे या गोष्टी तिला बिलकूल आवडत नसत.

दोन तीन महिन्यांनीं आपोआपच तिच्या मनासारखे घडून आले.

* * *

कॉलेज रेसिडेन्सीच्या कोपऱ्यावरील खोलींत स्टोव्हचा आवाज ऐकू येत होता. दामूची स्वारी कितीक दिवसात आज अभ्यासास उठली होती. पहाटे चाराचा सुमार होता तो. अभ्यास करायचा म्हणजे जागणें आवश्यक होतें व जागे रहाण्याकरिता त्यास चहाहि जरुरीचा होता.

दामूनें चहा घेतला व अभ्यासाचे पुस्तक उघडलें. परंतु वाचनास प्रारंभ करण्यापूर्वी त्यानें सहज खिडकी बाहेर नजर टाकली.

चांदणें पिठासारखें शुभ्र पडलें होते. सर्वत्र शुकशुकाट होता.—

कशानें तरी दामूची दृष्टी आकर्षून घेतली. शकुन्तला साठे ! हो शकूच...ती जोरानें पळत होती. तिच्या मागे एक कुत्रा धावत होता... त्याने परिस्थिति जाणली. स्त्रीदाक्षिण्यानें त्याच्या अंतःकरणात प्रवेश केला. कुत्रा —कीं ज्याला बदमाषसुद्धा भितात— लाडगेसुद्धा ज्याच्यापुढें हयगयीला येतात—मग शकुन्तला...शकूचा त्याच्यापुढे काय पाड ? —शिवाय तिच्यावर वजन बसवण्यासहि ही सन्धि नामी आहे...

* * *

दामू त्या कुत्र्याचे मागे पळू लागला...कोणी तरी मनुष्याची आकृति आपल्या मागे धावत आहे, हें पावलाचे आवाजावरून कळताच शकुन्तलेनें आपला वेग पालटला व ती थेट न जाता रस्ता बदलून जाऊ लागली....

दोनदा असेच झाले.

कांहीं वेळाने 'थाबा, घाबरू नका... मी आहे, दामोदर जोग... ' असे शब्द शकुतलेच्या कानी आले तेव्हा ती अधिकच जोराने धांवू लागली. इतक्यात मागून कुत्र्याचें केकाटणें ऐकू आले. त्या क्षणीं ती थाबली...तिच्या जिवात जीव आला.

' कोण, टाम्या तू आलास होय? मला कल्पना नव्हती कीं मी रनिंगला निघताना येशील मागे म्हणून. बरे झाले. छूः... !'

दामू नजीकच आला होता. त्यावर त्या इमानी कुत्र्यानें, ते किचाळत होते तरी झेप टाकली.

* * *

दामू लगडत लगडत कसाबसा रेसिडेन्सीकडे पोहोंचला.

शकुतला हसत होती.

* * *

त्याला सर्व प्रकार कळलाच होता. तो विलक्षण खजील झाला होता. त्यात आणखी शकुतला साठेनें दामूची गाठ त्याच दिवशीं कॉलेजमध्यें घेतली व त्यास बजावलें 'मिस्टर दामोदर जोग, एकादी मुलगी, एकटी

रनिंगला गेली असता तिच्यामागे वळणे व त्यातून केव्हां नव्हे तो कालच आलेल्या माझ्या आवडत्या टाम्याला दगडानें रक्त येईपर्यंत मारणें, तुमच्यासारख्या मर्दालाच शोभते. तरी बरें, तुम्हाला टाम्यानें अद्दल घडवली आहे, म्हणून, नाहींतर सारी हकीगत प्रिन्सिपॉल साहेबानाच कळवणार होतें. आता या पुढें तरी असला हलकटपणा करू नका. बाकी आमचा टॉम्या पुन्हा तुमच्या भेटीची वाट बघतोच आहे. मी आता नेहमीं आजच्याच बाजूला रनिंग करण्यासाठीं येणार व टाम्याला बरोबर आणणार आहे.'

बिचारा दामू सर्दच होऊन गेला...

व त्या दिवसापासून तिच्या मागचा त्रास चुकला.

## ' हांच तो ' : : : १२

' त्या भाड्यातलें पाणी देता मला ? '

' अहो, हा थर्मास आहे ! यात कॉफी आहे गरम ! '

' होय ? आता आले लक्षात ! गेल्या वर्षी सायन्सचे मास्तर अशाच धाटणीचे एक उपकरण समजावून सागत होते खरे...पण हाय...जाऊं द्या तो विचार ! ! आपण त्या समयीं कविता बनवीत होतो, सध्यां खातोंच आहोंत फळे केलेल्या कृत्याची !......'

' काय बोललात !'

' काहीं नाहीं, म्हटल मी रत्नागिरीस जात आहे आंबे चापायला. मला सर्व फळात लहानपणापासून आबे फार आवडतात. माझ्या भावी बायकोचे नाव देखील मी अबाबाई असें योजून......'

'तें असू द्या, तुमचें नांव तर सांगाल ?'

' आधीं त्या भाड्यातले नव्हे थर्मासमधलें पाणी का कॉफी काय म्हणालात तें आणा बघूं. मघाशी तुम्हाला पितांना पाहिलें या थर्मासमधून !'

वाटलें पाणीच आहे, अधिक चौकशी अती कॉफी असल्याचें उमगले, वाईट नाहीं म्हणा, पेयाच्या कामात नगाला नग असला तरी चालतो आपल्याला!'

'भले महाराज. मला सिगारेट पिताना बघितले तर तहानेकरिता ती देखील मागाल...' असे म्हणत त्या इसमानें नजिकच्या तरुणास कप भरून कॉफी दिली.

तरुणानें चुटकीसरसा कप रिकामा केला व सदऱ्याच्या खालील टोकानें तोंड पुसून पृच्छा केली 'तुमचे नाव आबा ना?'

'तुम्हाला कसे ठाऊक?'

'कवि—कल्पना!! मी कवी आहे' तो तरुण उद्गारला 'आणि त्यात तुम्ही बडोद्याला गाडींत चढलात तेंव्हा तुम्हाला पोंचवण्यास आलेली मंडळी 'आबा, आबा' असेच संबोधताना मला दिसली. माझी तुम्हाला अप्रत्यक्ष ओळख खास असणार! तुम्ही 'सोरटी–सोमनाथ' नामक कवींची रसाळ कवनें ठिकठिकाणीं वाचली असतील ..त्यापैकीं कांहीचे तुमच्या जिव्हाग्री देखील वास्तव्य...'

आबा त्या मनुष्याकडे पहात एकदम बोलले "तुम्हीच तें कवी 'सोरटी सोमनाथ!"

'अखेर रसिक आढळला' कवी सोरटी–सोमनाथ हर्षभरानें आबाच्या मांडीवर थाप मारीत ओरडले.

आबा चेहरा गोरामोरा करीत किंचित दूर सरकले.

'लांब का? दूर का? बाजूला का?' सोरटी–सोमनाथ आबाच्या सन्निध जात उद्गारला. "माझे वय पंचविशीच्या आतीलच...पण उत्कृष्ट कवी! जातीवंत काव्य हे शारदेच्या कृपेनें मला स्फुरते. महाराष्ट्रात रसिकाची वाण आहे. माझेंच वृत्त ऐका. दिल्लीहून मी मुंबईस निघालों. मुंबईहून आगबोटीनें रत्नागिरीला मी जाणार!! हा इंटरचा डबा बहुतेक रिताच असे. तुमच्या अगोदर एकजणाने मला 'तुम्ही काय शिकता?' असा प्रश्न केला होता. मी 'इंटर' मध्यें आहे' असे उत्तर दिलें. इंटरमध्यें म्हणजे इंटरच्या डब्यांत हा श्लेषार्थ त्याच्या टाळक्यांत उतरला नाहीं. अरसिक बेटे!!

बडोद्यापासून मात्र मला तुमचा अलभ्य लाभ घडला. काय विशाद होती हिंदुस्थानातील महाराष्ट्रात मी जिता असताना बंगालच्या रवींद्रनाथ टागोराला ' नोबेल–प्राइझ ' मिळायची ! ! महाराष्ट्र म्हणजे उपेक्षेचे मायपोट ? माझे तर आजपर्यंत काव्य शक्तीबद्दल कौतुक व्हायचें सोडून ' तुम्ही कवी नाहीं ' या वाक्यानें मला हैराण करण्याचा प्रयत्न झाला...'

'जनता—जनार्दन नेहमींच सत्य वदतो' आबा बोलून गेले.

'काय ?'

' काहीं नाहीं '

' लोक मी कवी नाहीं इतकेच ठरवून गप्प बसले नाहींत. मी कोण आहे हेंहि त्यानी सागून टाकले म्हणे ' मी गाढव आहे. त्याचें गर्दभ हें विशेषण खोटे ठरवण्यासाठीं मी मुंबईचा ' मेयर ' होण्याचा बेत आखला होता. अशाने घोड्यात तरी जमा झाली असती...'

' अस्से ' यावेळीं आबाच्या मुखड्यावर स्मित झळकले.

' प्रथम दृष्टीतच तुमच्याविषयीं मला आपुलकी वाटू लागली. याचे असेंहि कारण असेल. तुमचे नाव ' आबा ' व माझे अत्यत आवडीचें फळ ' आंबा ' फक्त एका अनुस्वाराचीच दोन्ही अभिधानात गफलत ! माझी काव्ये तुम्ही कुठे कुठे वाचलीत ?...'

' छापील काहीं आढळले नाहीं. हस्तलिखित कवनें मात्र...'

' हा, हा, त्या 'चले जाव' या हातानें लिहिण्यात येणाऱ्या मासिकात...'

' न नी ना ना नना...' आबा बेफिकिरपणें गुणगुणू लागले.

' लक्ष आहे ना इकडे...'

कवि सोरटी–सोमनाथानें किंचित् रागाने विचारले ' आपण दोघेच डब्यात आहोत तेव्हा मी तुमच्याशीं संभाषण करीत आहे. '

' ना न ना नी न ने ना...'

" मेहरबान, आपण कोणत्या उद्योगानें पोट जाळता ?"

' काय ? कोणाला ? कसले !'.प्रश्न ध्यानांत न राहिल्याकारणानें आबा गोंधळले.

'आबा, आपण मला आंब्याप्रमाणें प्रिय आहा म्हणून माझेसंबधी मी काहीं एक चोरून ठेवीत नाहीं. मी लहानपणापासूनच अती कल्पक! सदा कल्पना सृष्टींत विहार!! माझ्या विधानाची सत्यता पटण्यासाठीं काहीं उदाहरणें सागतों. आईनें मला एकदा सुया आणायला फर्मावलें. भाजीची विक्री करणारी ती जशी भाजींवालीण तशी सुई विकणारी ती सुईण असल्या सरळसोट कल्पनेने मी सुईणीकडे गेलों. सुईणीनें जाताक्षणींच 'आईला नववा महिना लागला का?' हाच सवाल विचारला. पस्तीस वर्षाच्या माझ्या मातेस नववा महिना आहे का? या निर्लज्ज पृच्छेस मी सण-सणीत उत्तर दिलें. आईचे वय तीनावर पाच पस्तीस आहे हें तिला-पटवले. सुईण हसूच लागली. व तिनेच अखेरी मला दुकानातून सुया विकत आणून दिल्या. माझ्या थोरल्या बहिणीच्या विवाहाचे वेळेस वडिलाना माझ्या कल्पनाशक्तीचा अपरिमीत फायदा झाला. बहिणीला मोटारीची फार लालसा! नेहमीं मोटारमधून हिंडावे ही तिची इच्छा. हुंडा म्हणून जाव-याना मोटारच बहाल करण्याचे ठरले होतें. परतु जावयास सायकलवरून फिरण्याचा बहुत नाद. सायकल द्या म्हणूनच ते रुसले. इकडे मोटार घ्या असें माझ्या भगिनीचे टुमणे वडिलाच्या मागें होतेच. दोघाच्या आवडीच्या दोन वस्तु खरेदी करायच्या म्हणजे खर्च वाढत होता. शेवटीं माझी कल्पना तीर्थरूपाना फार मानवली. वधूवराना 'मोटार-साय-कल' देऊन उभतांस खूष ठेवण्याचे मुक्रर झालें. शाळेंत पेपर लिहितानाहि मी अभ्यासावर विशेष भर न देता पुष्कळ वेळा कल्पकतेवर भागवून नेत असे. इतिहासाच्या पेपरात एकदा टिपणे करा या फर्मानाखालीं 'तोडरमल' हा ऐतिहासिक माणूस आला होता. त्या समयीं मी खरडले तोडरमल हा अकबराच्या कारकीर्दींतील एक प्रसिद्ध मल्ल होता. बरे आबा, माझी कविता तुम्ही डोळ्याखालून घातलीच आहे. माझे काव्यगायन...'

'नको. आगगाडीच्या धडधडाटात...'

'येईल ऐकायला. आवाज उंचावतो.........' 'कविता पंधरा दिवसापूर्वींची आहे. काव्याबद्दल माझी मतें स्वतंत्र· आहेत. यमक मात्रा ही छंदे व ढोंगे मला मुळींच पसंत नाहींत. हे मना-

मध्यें नीट वागवून कविता लावा.' आवा कांहीं बोलणार तोंच घसा साफ करून सोरटी-सोमनाथ गाऊ लागला.

## ' पराक्रमी बाळ्या '

[ वृत्त—स्वनित ]

बाळयाला आमुच्या दिले जननिनें वीरश्रीचे शिक्षण
सागे 'भारति'च्या कथा अन् पुन्हा तैसेंच ' रामायण '
वाटे तीस अहो जिजाइ (?) आणखी बाळ्या जिजाईसुत
म्हणुनी ती अपुल्या मुलास नेहमीं गोष्टी असे सागत १

या देशी आपुल्या समग्र सत्ता आंग्लाचि असल्यामुळे
बाबूची करुनी ' धनुक्लि ' दिली बाळयाला स्वतःच्या बळे
दिधले शिक्षण त्यास हें कीं कैसा मारावयाचा तिर
अगदीं तो दिसण्या घरात कैसा ? जैसा रणीचा विर २

एके दिवशी नेम बाजि करता राहे उभा आगणी
तळपे तो रणशूर लोक जैसे तैसाचि त्या आगणीं
भितीच्या वरि त्या समोर वरती राहे उभा वानर
त्या पाहता ' विर बाळ ' हाच आमुचा होई पहा ठिक्कर ३

काळें ठिक्कर तोंड होई बघता त्या वानराला अहा !
डागानें पिवळ्या चकाकुन दिसे चड्डीहि त्याची पहा !

' कशी काय वाटली ही कविता ?' कवीच्या अधिऱ्या मनाची चौकशी होती ती.

' वाः !'

' आणखी म्हणतो......'

' नका, नका तसदी घेऊ...'

' थाबा. काव्य गायन पुन्हा सुरू होण्याच्या अगोदर आताच्या कवितेसंबंधी एक गुप्त हकीगत निवेदतो. तुमच्यासारख्या बडोद्यास राहणाऱ्या बहुश्रुत रसिकाला ही कविता आवडते व त्याच गावचे—बडोदा येथीलच—' गुडदाणी ' या साप्ताहिकाचे हेंच कवन साभार परत करणारे संपादक किती निर्बुद्ध आणि अजागळ...'

'तोंड सभाळून बोला' आबा गरजले.

'सपादकानेंच स्वतःचे थोबाड ताब्यात ठेवावें. शेण खावू नये...'

'चुप रहा तुम्ही ज्याविरुद्ध ठणाणत आहा तोच मी 'गुडदाणी'चा सपादक. बादशहाच्या राज्यारोहण दिनानिमित्त काहीं युरोपियनाना भेटण्याकरिता मुबईस निघालों आहे.'

'मुबईस जा, नाहीं तर सोनापुरला काळें करा; माझ्या कवितेचीं बाडेंच्या बाडें साभार परत आलीं. माझा मोठेपणा तुम्हाला काय समजणार? 'किर्लोस्कर'च्या गेल्या अकात माझे समग्र चरित्र प्रसिद्ध झाले आहे. पहिल्याच, पानावर तें आहे. 'सोरटीसोमनाथ' हे माझे कवितेपुरतें टोपण नाव आहे.'

'मला वाटत युष्मादिकाना आमच पत्र गेलेच आहे, कीं, फिरून आमच्याकडे कविता धाडून सपादकीय कचेरीस छळु नका. समक्ष आपणाला हात जोडून तेंच बजावतों....'

तुमची मला जरूर नाहीं. आपल्या साप्ताहिकाला आजपासून मी 'गुडदाणी' न सबोधता 'पिकदाणी' या नावानें हिणवणार, त्या पिकादाणींत मी थुकणार, खाकरे बेडके, ओकारी...'

इतक्यात कोणचेस महत्त्वाचें स्टेशन आल्यामुळे आगगाडी थाबली.

'या 'पिकदाणी'चे सपादक प्रवास करीत असलेल्या गाडींतून देखील जायचें नाहीं' असें मोठ्यानें पुटपुटत आपली बॅग घेऊन 'सोरटी-सोमनाथ' कवीनें निर्याण केलें.

यावेळीं आबाहि, रित्या झालेल्या थर्मोस फ्लास्कमध्यें कॉफी भरण्यासाठीं, फलाटावर उतरले.

'सोरटी–सोमनाथ' प्रथम व्हीलर स्टॉलपाशीं गेला. पुढची गाडी येईपर्यंत तिथलींच वर्तमानपत्रें चाळायचा त्याचा विचार होता.

'सोरटी–सोमनाथ' कवीच्या जवळच एक फुकटया पोलीस 'किर्लोस्कर'चा मागील महिन्याचा अक बघत होता.

मुखपृष्ठानतरच्या पानावरच शिपाइ बुवाचे डोळे खिळले होते.

'१०० रुपये बक्षीस'

या मथळयाखालचा मजकूर त्यानें अधाशासारखा तीन तीन वाऱ्या-नजरेखालीं घातला.

' आमचा मुलगा पाडू हा मॅट्रिकची परीक्षा पाचव्यादा नापास झाल्या-कारणानें बाप मारील या भीतीनें घरातून कुठे पळाला आहे. कविता करण्याच्या हव्यासामुळें परिक्षेस गोते बसले. डोक्यावर घडीची काळी टोपी. शेंडी शेंकडा नव्याणव हिश्श्यानीं बाहेर असणार. अगात पाढरा कोट. त्यावर शाईचे डाग पडलेले, धोतराचा काचा अव्यवस्थित प्रकारे मारलेला. धोतरास पिवळे ठिपके आढळतील. त्याची कारणमीमासा विचारली तर ' आम्ही शाळेत निळी किंवा जाभळी शाई उपयोगात न आणता केव्हा केव्हा पिवळी वापरतों', असें पाडू उत्तरेल. दिसण्यात अजागळ. अगाचा घाम अगर तोंडाचा ओलसरपणा सदऱ्याच्या पुढील बाजूनें पुसण्याची सवय—बोलण्या चालण्यात किंचित् वस्ताद. मुलाच्या सर्व नातलगास त्याची काळजी वाटत आहे. शोधून देईल त्यास १००रु. रोख मिळतील !'

—पाडूचे वडील

वक्रतुड जनमेजय समर्थ

छिद्वाडा पान तबाखु भुवन

विचार करीत पोलिसानें—' किर्लोस्करचा ' अक मिटला व स्टॉलवाल्याचे अगावर भिरकवला.

अगदीं सहज त्याची दृष्टी 'सोरटी—सोमनाथा 'कडे वळली.

' हाच तो ' पोलिस एकाएकीं ओरडला.

'काय ! ' व्हीलर स्टॉलवाल्यानें घाबरत विचारलें.

' सोरटी—सोमनाथ ' कवीला गदगदा हलवीत पोलीस उद्‌गारला ' हाच तो '

याच सुमारास आबा कॉफीनें परिपूर्ण असा थर्मास घेऊन इंटरच्या डब्याकडे जात होते त्याना पोलिसानें येण्याबद्दल खुणाविलें.

तशी थरकापांतच आबा आले.

'इजा, बिजा अन् तिजा' सोरटी—सोमनाथाला काबूत धरलेला पोलीस

आबाना म्हणाला ' तुम्ही त्या किर्लोस्करच्या अकांतले पहिले पान पहा. नतर 'व्हीलर स्टॉल'वाला देखेल. मी बघितलेच आहे. माझी अशी खात्री आहे कीं हाच तो वक्रतुड जनमेजय समर्थ याचा चिरजीव पाडू......

' बरोबर आहे ' आबा किर्लोस्करच्या पहिल्या पृष्ठावर नजर टाकून बोलले. नतर त्यानीं ' सोरटी–सोमनाथाना खोचक तऱ्हेनें विचारले ' किर्लोस्करमध्यें चरित्र आले अशी बढाई मारलीत ते हेच वाटते !'

जास्त खिजविण्याची इच्छा असूनहि गुडदाणीचे जे सपादक श्री. आबा यानीं गाडीची वेळ झाल्यामुळे इटरच्या डब्याकडे कूच केले.

व्हीलर स्टॉलवालाहि इष्ट त्या पानावर दृष्टी टाकून बोलला ' शिपाई दादा, माझेंहि तुमच्याप्रमाणेंच ठाम मत आहे. पाडू म्हणजेच हा युवक'

'आता मीहि धावपळीला कटाळलोच आहे. पळालों तेवढ्या अवधींत माझ्या नावावर वडिलानी जे बॅकबुकात पैसे ठेवले आहेत त्यावर चैन उडवली. कविताहि खूप बनवल्या पण त्या ' गुडदाणी,' नाही 'पिकदाणी' साप्ताहिकाकडून परत आल्या. नोबल प्राइज जिकण्याची आशा विरली. मी कबुली देतों. मी वक्रतुड जनमेजय समर्थ याचा मुलगा पाडू......'

असे म्हणून तोडावर घाम साठला होता तो सदऱ्याच्या पुढच्या टोकानें कवि ' सोरटी–सोमनाथ' यानें पुसला.

'मी म्हटले नाहीं हाच तो. आता शभर रुपये बक्षीस. नशीब बाबा नशीब...' पोलीस व्हीलर स्टॉलवाल्यास उद्देशून डौलानें बोलला.

व्हीलर स्टॉलवाला उत्तरादाखल नुसता हसला.

# स्वर्गाच्या काटेवर : : : १३

साधारणतः कुठेहि असलो तरी सक्रान्तीनतरच्या हुरडयाच्या दिवसात नागनाथवाडीला जायचा माझा नियम अलीकडे चारपाच वर्षे टळला नव्हता. नागनाथवाडीला मल्हारी पाटलाची फार मोठी शेती होती. त्याच्या शेतात हुरडयाच्या सर्व जातीची कणसे होती.

सातारा जिल्ह्यातील आमच्या माण तालुक्याला दूध मोगरा लावला होता एकटया मल्हारी पाटलानेंच.

मल्हारी पाटील आता म्हातारा झाला होता. त्याची पहीपाहुण्याचे आदरातिथ्य करण्याची फार दिवसापासून ख्याति होती. मी एकदा काही कामानिमित्त नागनाथवाडीला गेलो असता माझा मल्हारी पाटलाशीं परिचय झाला व तेव्हापासून दरवर्षी मी हुरडा खाण्यास जात होतो.

तसाच यदाहि गेलों.

ऐन थडीचे दिवस. सकाळीं सात आठचा सुमार होता. मल्हारी पाट-

लाच्या गड्यानीं जागा साफसूफ करून घोंगडी टाकली. मी, मल्हारी पाटील व आसपासच्या शेतातील दोनतीन मालक असे घोंगडीवर बसलों.

खेड्यातील शेतावरचा हुरड्याचा बेत म्हणजे मोठी गम्मत असते. खोबऱ्याची चटणी, दाणे, गुळ, दही, वगैरे साहित्य हुरड्याबरोबर हमखास असायचेच.

मल्हारी पाटलाच्या गड्यानीं झगरे पेटवले. कणसे भाजण्यास सुरवात झाली. एक एक कणीस चोळून व दाणे एका हातावरचे दुसऱ्या हातावर घेऊन, फुकून, आम्हापुढे एक गडी ठेवू लागला.

हुरडा खाण्यास सुरवात झाली.

आम्ही गप्पा मारीतच होतों.

बोलता बोलता मी एक प्रश्न मल्हार पाटलाना विचारण्यासाठीं मनात योजून आलों होतो त्याची मला आठवण झाली.

'काय हो पाटील' मी म्हटलें, 'दोन चार महिन्यापूर्वी याच तालुक्यात एका बाईनें खून केला असें वाचले, तुम्हाला विचारायचे कारण बातमीमध्यें तुमच्या नागनाथवाडीचें व तुमचेंहि नाव ठिकठिकाणीं वाचल्याचें मला स्मरते!'

'अहो मल्हार पाटील, त्या पुतळनें केलेला खून हो' एकजण मल्हार पाटलाला म्हणाला.

'खरोखर पुतळनें खून केला तरी सर्व प्रकरणात माझ्या दृष्टीनें दोषी मलक्याच आहे,' मल्हार पाटील त्या इसमाकडे वळून म्हणत होता.

'कोण मलक्या? एकदर हकीगत काय आहे ती तर सागाल कीं नाहीं?' मी मल्हार पाटीलाना विचारले.

'अहो, गेल्याच वर्षी भैरव, पुतळ, मल्लिकार्जुन तिघेहि माझ्या शेतावर कामाला होती—'मल्हार पाटलानीं हकीगत सागण्यास प्रारभ केला. 'भैरव व मल्लिकार्जुन म्हणजेच मलक्या, हे बरोबरीचे. मलक्याला व भैरवलाहि घरचे कोणी नव्हते. मलक्याला फक्त एक बहीण होती, तिचे नाव पुतळ. तीही माझ्याकडेच कामाला होती.

भैरव व मलक्या जिवाला जीव देणारे गडी. दोघेहि माझ्या मोटेचे

काम करीत असत जोडीनें. मोट हाकताना दोघेहि गोड गाणी म्हणत त्यामुळें आम्हीच काय पण मोटेला बाधलेली मुकी जनावरेहि माना डोलवीत.

आज दोन वर्षें होतील, मलक्याचे लग्न झाले होते. मलक्या भैरवला म्हणे ' तुझ्या लग्नाची माझ्यासारखी काळजी नाहीं, माझी पुतळी आहेच तुला. '

पुतळ व भैरव याचे एकमेकाशी लग्न आज ती दोघे माझ्या शेतावर सात–आठ वर्षें होती तेव्हापासूनच ठरलें होते. समजू लागल्यापासूनच ती दोघे एकमेकास नवरा बायको या नात्यानें ओळखीत असत.

आणि दोघेहि यथायोग्य नवरा बायको शोभली असती. मी त्या तिघानाहि बालपणापासून बघितले आहे. भैरवचा स्वभाव फारच दिलदार, सरळ व प्रेमळ असे व पुतळहि पण तशीच. तिनें भैरवचा स्वभाव जाणला होता.

भैरव व मलक्या यामध्ये अकृत्रिम मैत्री होती. एकाला काटा मोडला तर दुसऱ्याच्या डोळयाला पाणी यावे असे त्याचे मित्रप्रेम होते. ते पुढेहि तसेच टिकले असते, पण मलक्याच्या दुर्दैवाने त्याला बायको चागल्या स्वभावाची मिळाली नाहीं. ती घरात आल्यावर पुतळाचा दुस्स्वास करू लागली. नवऱ्याला आपल्या ताब्यात ठेवण्याचा प्रयत्न करूं लागली. तिचा स्वभाव फार हावराहि होता.

सहवासानें शील बनते म्हणतात तसे मलक्याचें झाले. तो ससारात अधिक लक्ष घालू लागला. ससारातील घालमेलीत रमू लागला. पैसा मिळविणें हें त्याचें ध्येय होऊ लागलें

आमच्या माळावरच्या विहिरीवर दोघेही मोट कित्येक महिने चालवीत होते. ही विहीर माझ्या पणजोबानीं बाधली. माझ्या वडिलाच्याहि जन्मापूर्वीची ही गोष्ट.

विहिराला दोन मोटा बारा तास चालतील असं पाणी माझ्या आठवणीपासून परवापर्यंत होते.

पण गुदस्ता माळाखालच्या नथुरामानें एक विहिर खणली. त्या विहिरीला पाणी सपाटून लागलें. पण कमनशिबानें ती विहीर आमच्या माळा

वरील विहिरीच्या मुळावर आली. आमच्या विहिरीचें पाणी आटू लागले.

ही गोष्ट एक दिवस मलक्या व भैरव मोटा चालविण्यास गेले असता कधीहि खडकाला न लागणाऱ्या मोटा त्यावर धडका घेऊ लागल्या तेव्हा त्यांच्या ध्यानीं आली.

त्याच वेळी घडलेला प्रसग म्हणजे खडकाला आदळणाऱ्या भैरवच्या मोटेच्या कगोऱ्याला लागून एक सोन्याची साखळी वर आलेली भैरवने पाहिली. आमच्या पणजोबाचे वेळी पडली होती ती साखळी! प्रयत्न करून सुद्धां सापडली नाहीं ! म्हाताऱ्याने याबाबत माझ्याजवळ केलेला उल्लेख मला चागला आठवतो.

ती साखळी आता भैरवाच्या हाती आली.

भैरवाने ती मलक्याला दाखविली व म्हटले ' मल्हारी पाटलाला ही साखळीं दिली पाहिजे. ' भैरव ' मी देतो ' म्हणून म्हणत असताना मलक्यानें साखळी देण्याविषयी आग्रह धरला. भैरवाचे मनात दुजाभाव नव्हता मलक्याविषयीं. त्यानेहि आढेवेढें न घेता साखळी मलक्याच्या स्वाधीन केली.

रोजच्यापेक्षा थोड्या लौकरच मोटा आटोपल्या. साखळीचे कुतूहल होते. शिवाय विहिरीतहि पाण्याचा खडखडाट झाला होता

भैरव नतर पुतळच्या शोधास गेला. जाताना मलक्यास त्याने साखळी घरी जाण्याचे अगोदरच मला देण्याविषयीं बजावले होतें.

परतु मलक्या आपल्या बायकोची जिनगर बनला होता. त्याला आधीं तिच्याकडे धाव घेणे जरूरीचे वाटले.

तो अगोदर स्वतःचे घरीं गेला. त्याने बायकोला साखळी दाखवली, अजून दिवस बराच असल्यामुळे पुतळ घरीं गेली नव्हतीच. ती जाईपर्यंत मलक्या व त्याची बायको याच्या गोष्टीं सुरूच होत्या.

भैरव रोज काम करीत असे दिवस मावळेपर्यंत. आजच जरा त्याला सवड होती. त्यानें पुतळचा शोध घेतला. ती शेतातच कापसाची बोंडे वेंचीत होती. तिला त्या कामात साजकाळपर्यंत भैरवने मदत केली. काम करता करता त्यानें साखळी कशी सापडली व आपण मलक्याजवळ मला देण्यासाठीं कशी दिली वगैरे हकीकत पुतळेला सांगितली.

भैरवचा तो दिवस आनदात गेला.

दुसऱ्या दिवशीं मलक्या व भैरव यांना माळावरच्या विहिरीवरच मोट धरायला जायचे होते. पण माळावरील मोट विहिरीचे पाणीच अजिबात आटल्यामुळे चालणें शक्य नव्हते. तेव्हा कामाला कोठें जावें हे विचारण्याकरिता व सोन्याची साखळी कोणाची होती याचाहि तपास लागेल अशा दुहेरी हेतूने भैरव माझ्या घरी येण्यास निघाला होता. तोंच......

मी, पोलीस व मलक्या येत असलेले भैरवने पाहिले. मी त्यास पाहिल्या वर, खाल्लेल्या मिठाशी निमकहराम झाल्याबद्दल भैरवाला बोलण्यास सुरवात केली मलक्या पोलिसास म्हणाला, ‘ भैरवाच्या घराची झडती घ्या, म्हणजे मी तुम्हास सागतो ते खरे का खोटे ते कळेल. ’ पोलिसानेंहि झडती घेण्यास आरभ केला व त्यास मलक्या आणि मी मदत करण्यास गेलो.

पण आम्हास भैरवने हटकले. मलक्याला त्याने ‘ काय झाले ’ म्हणून विचारले.

मलक्या माझ्याकडे पाहून म्हणाला ‘ चोर तो चोर आणि वर शहाजोग पहा किती आहे. जणू काय माहितच नाहीं काहीं ! बरे झाले ! माझी बहीण याच्या गळ्यात घातली नाहीं म्हणून, नाहींतर चागलाच फसलो असतो. ’ नतर तो भैरवकडे वळून बोलला. ‘काल माझ्या देखत साखळी मालकाला नेऊन देतो म्हणालास, मी सकाळीं पाटलाना विचारायला गेलो तेव्हा तुझी लबाडी मला कळून आली, ’ असें म्हणून मलक्या झडती घेऊ लागला.

भैरवच्या सर्व प्रकार लक्षात आला. त्याच्या अगचा सताप झाला. त्याने सर्व हकीकत मला सागितली पण त्यावेळी मला ती बनावट वाटली. मलक्यानें मला पूर्ण भारले होते. आणि झडतीत जेव्हा दरवाज्यापासले दोन सोन्याच्या साखळींतील तुकडे मलक्याने दाखविले तेव्हा तर माझी खात्रीच झाली.

हे तुकडे सापडले नव्हते, तोवर भैरव जोरजोराने मलक्याच गुन्हेगार असल्याबद्दल मला पटवून देत होता.

पण त्याच्या समक्ष जेव्हा मलक्याने साखळीचे दोन तुकडे केले, तेव्हा भैरवाने आदल्या दिवशीं त्याला सापडलेल्या साखळीचेच ते तुकडे असें ओळखले. पण——

'तुझ्याजवळ साखळी नाहीं म्हणतोस तर हे तुकडे कसे ?' असें विचारताच तो जरा वेळ हतबुद्ध झाला. पण लगेच रागानें लालबुद होऊन मलक्याचे अगावर धांवून जात तो ओरडला ' या दुष्टानेंच काळेखोरपणा केला. यानेंच रात्रीचे वेळीं दरवाजावाटे माझे घरात हे तुकडे टाकले आहेत.'

पोलिसानीं भैरवाला अडवून त्याचे हातात हातकड्या अडकवल्या.

नतर सबंध साखळीचा शोध न लागल्यामुळे व मलक्यानेंहि एकदां, 'माझ्यावर आळ घेऊन हा चोर साव होऊ पहात आहे, पण तुम्ही' माझ्या घराची एकवार झडती घेऊन मनातील किल्मिष निवाराव ' असें पोलीसास म्हटल्यामुळे त्याच्याहि घराची झडती घेण्यात आली. पण काहीं उपयोग झाला नाहीं.

पुतळला ही हकीगत रात्रीं समजली. मला मलक्यानें तिला या गोष्टीची थागपूस लागू न देण्याविषयीं सुचविलें होतें, म्हणून मी सकाळींच तिला शेजारच्या गावीं काहीं काम काढून रवाना केले होते.

तिनें मला भैरव निरपराधी असल्याबद्दल सागितलें, त्याची भेट करून देण्याबद्दल माझ्याजवळ काकुळती भाकली. पण तिला कोणत्याहि तऱ्हेची मदत कोणी करू शकले नाहीं.

भैरव गुन्हेगार असल्याबद्दल पोलिसाची व माझी खात्रीच होती. मलक्या तर पहिल्यापासूनच तसे म्हणत होता.

शिवाय थोडाफार पुरावाहि मिळाला होता.

भैरवानें रात्रीच्या अधारात साखळीचे तुकडे करून गुप्त ठिकाणीं ठेवले असावेत व त्या धादलीत आम्हास सापडलेले तुकडे पडले असावेत अशी आमची ठाम समजूत झाली.

कोर्टात खटला होऊन भैरवाला दोन महिने सक्त मजुरीची शिक्षा झाली.

पुतळची खात्रीच होती भैरव निर्दोषी असल्याबद्दल. तिनें त्याला भेटण्याविषयीं ध्यास घेतला होता.

पण खटल्याचे दिवशीं भैरवची व तिची दृष्टभेटच फक्त होऊ शकली. तिनें कोर्टात रडतरडत तिला माहीत असलेली सर्व हकीगत सागितली. भैर-

वचा बचाव तिच्या मगदुराप्रमाणें करण्याचा तिनें प्रयत्न केला. पण त्याचा कवडीमात्र फायदा होऊ शकला नाहीं.

भैरवची प्रेमळ नजर पुतळवर शेवटपर्यंत खिळली होती. मात्र जातां जाता मलक्याकडे एक क्रुद्ध दृष्टिक्षेप भैरवनें टाकलेला मी पाहिला.

मलक्यानें लौकरच माझी नौकरी सोडली. पुतळ त्याची रोज कानउघाडणी करीत असावी मित्रघात केल्याबद्दल. ते याला व त्याचे बायकोला पटलें नसेल म्हणूनही ते दुसऱ्या गावीं निघून गेले असतील कदाचित्. पण पुतळ माझ्याकडेच कामाला होती.

ती मला भैरव निरपराधी असल्याबद्दल नेहमी सागे, पण माझ्या मनाला ते केव्हाच पटलें नाहीं. भैरव दोषी असल्याबद्दल माझा कयास तोंपर्यंत कायमच होता.

पुष्कळ खटपट करून पुतळ एकदा भैरवला तुरुगात भेटली. फार वेळ भेट होऊ शकली नाहीं. पण तेवढ्यांत भैरवनें मलक्याचा पत्ता पुतळजवळून विचारून घेतला.

पुढें तो तुरुगातून सुटला.

पुतळ तुरुगाच्या बाहेरच उभी होती. भैरवला सध्याकाळीं सोडण्यांत आलें होतें. सकाळी आलेली पुतळ दिवस मावळेपर्यंत तुरुगाच्या बाहेरच उभी होती.

भैरव बाहेर पडल्याबरोबर इकडेतिकडे न बघता तडक चालू लागला. तो विचाराच्या तद्रीत होता. पुतळकडे त्याचे लक्षच गेले नव्हते.

पुतळनें भैरवला गांठले. तिनें बरोबर थोडे खायला आणले होतें ते आधी घेण्याबद्दल तिचा आग्रह होता.

भैरवनें पुतळकडे प्रेमभरानें पाहिलें व तिचा हात घट्ट धरून म्हटलें ‘ पुतळ ’

‘ भैरव...’ पुतळ आणखीहि पुढें काहीं म्हणणार होती इतक्यात भैरवच म्हणाला.

‘ पुतळ, मला आतां मलक्याचा सूड घेतल्याशिवाय खाणें–जेवणें सुचायचें नाहीं. मलक्या सारख्यानींच हे जग पापी बनवलें आहे. एक

पापी आत्मा जगातून काढून लावण्याचे पुण्य आज मी मिळवणार आहे. येवढें केल्यावर हा भैरव सर्वस्वी तुझाच आहे. पण आधी त्या सर्पाला ठेचतो, जगातले एक पाप नरकात रवाना करतो. मग या स्वर्गाकडे येतो. आलोच ह...'

भैरवने झटकन् पुतळचा हात सोडला व तिला बोलण्याचाहि अवकाश न देता तो नुकत्याच पसरू लागणाऱ्या अधारात दिसेनासा झाला देखील!

पुतळ घटकाभर उभी होती. नतर तिच्या मनात एक विचार चमकून गेला. ती झटक्या सरशी निघाली.

अजूनहि माझ्या मनातील भैरवविषयीचा कितु निघावा अशी तिची इच्छा होती.ती काळोखाचीच माझ्या घरी येऊन तो तुरुगातून सुटल्यानतरची खबर मला सागू लागली. पण भैरव विषयी माझा अनुकूल ग्रह तेव्हाहि झाला नाहीं. त्याच्या बाबतींत माझे अत:करण दगडाचे झाले होते.

माझ्या मनावर काहीच परिणाम होत नाहीं हे बघून जराशा निराश अत:करणानेच ती निघून गेली.

रात्री बारा म्हणजे ऐन झोपेची वेळ—जिकडे तिकडे सामसुम .....

मलक्याच्या माळवदी घरावरून प्रवेश करण्यास वाट होती. तेथून एक व्यक्ति आत शिरली. तिच्या हातात दोनतीन फरशीचे जड तुकडे होते.

त्या व्यक्तीनें जवळील फरशीचे तीनहि तुकडे जोरात मलक्याच्या मानेवर मारले. मलक्याची बायको जागी झाली. डोळे उघडून पाहिल्यावर, ती एकदम ओरडत ओरडत खोली बाहेर पळाली.

लोक जमले व आत घुसले. मलक्याच्या बायकोनें आता खोलीत डोकावण्याचा धीर केला.

पुतळ अश्रू ढाळत होती. कितीहि झाले तरी मलक्या तिचा भाऊ होता. लोकाचा जमाव पहाताच तिनें घाईघाईनें जवळ पडलेला फरशीचा तुकडा स्वत:चे अगावर मारून घेण्याचा प्रयत्न केला. पण लोकानीं तो सफळ होऊ दिला नाहीं. त्यानीं तिला धरून बाधून ठेवले.

पोलीस आले. पचनामा चालू होता.

इतक्यात गर्दीतून एक मनुष्य तीरासाखा पुतळजवळ आला. पोलिसा-

नीं त्यास घट्ट धरून ठेवले होते, तरी तो पुतळनजीक येण्याची शिकस्त करीत होता.

पुतळनें पाहिले. तो भैरव होता—

तो म्हणत होता ' पुतळ, काय हें ? हे कृत्य मी करणार होतो. तुला कोणी करायला सागितले ? माझी लोक बदनामी करतील म्हणून तू असे केलेस ? मला फाशी होईल या गोष्टीला तू भ्यालीस? वेडी रे वेडी! पुतळ काय हा तुझा मजकरता स्वार्थत्याग ? याला मी लायक तरी आहे का ? आता ते तुला फासावर लटकावतील. पुतळ, मी तुझ्यावाचून काय करू या जगात ?...' भैरव ढसढसा रडू लागला,

पोलीस–पचनामा सपला. पुतळला चार बदुकधारीं पोलिसानी मधोमध बेड्या घालून चालवले होते. भैरव बेफाम होऊन वाटेल तसे बडबडत तिच्यामागे चालला होता ' पुतळबरोबर मला फाशी द्या ' असे वारवार तो म्हणत होता. त्याच्या बडबडीकडे कोणी लक्ष पुरवीत नव्हता. फक्त त्यास दोघा पोलिसानी दडाला घट्ट धरून पुतळ मागोमाग चालवले होते.

जरा वेळ चालल्यावर भैरव म्हणाला ' जातो मी पुतळ आता, तुझ्या आधी स्वर्गात जाऊन तुझी वाट पहात बसतो. तिथे ये हू लवकर. तुला व मला स्वर्गच मिळणार खास.' नतर तो पोलिसाच्या मगरमिठीतून जोराने हिसडा देऊन निसटला.

पोलीस त्याच्या मागोमाग गेले.

पण दुसऱ्या दिवशी सकाळीच त्याना निराश होऊन परत यावे लागले. ते म्हणाले ' भैरवानें डोगराच्या कड्याखाली अग झोकून जीव दिला.'

पुतळनें गुन्हा कबूल केला. कारण विचारता ती म्हणाली ' मलक्यासारखे लोक बारीकसारीक पापे इतकी करतात कीं मृत्यूचीहि शिक्षा त्याना अपुरी पडते. ' भैरवच्या पहिल्या शिक्षेचा उल्लेख करून तो पूर्ण निर्दोषी असल्याचेहि तिनें कोर्टात सागितले म्हणतात.

पुढे रीतसर चौकशी होऊन पुतळ फाशी गेली.

मल्हारी पाटलाचे डोळे शेवटची हकीगत सांगताना भरून आले होते. तो म्हणाला ' कुठल्या कुमुहूर्तावर आमच्या घरातील सोन्याची साखळी

पडली होती कुणास ठाऊक. '

आसपासची मडळीं सर्व हकीगत माहीत असूनसुद्धा तटस्थपणें ऐकत होती. त्या सर्वांना वाईट वाटलेले स्पष्ट दिसत होते. मीहि पण त्याच्या दु:खात समभागी होतो.

झगरे केव्हाच विझून गेले होते. आमचे हुरडा खाणें सपलेच होते.

आम्ही सर्वच मडळी खिन्न चित्तानें उठलो.

## अप्सरा : : : १४

आसपासच्या प्रदेशातील समाज, आठवडयाचा बाजार भरणाऱ्या गावीं, शिमग्याच्या सणाला एकत्र आला होता. जत्राच भरली होती म्हणा ना!

त्यातील मुख्य स्त्री पुरुषाच्या नाचाचा कार्यक्रम सुरू झाला.

प्रत्येक तरुणानें आपल्या प्रेयसीला काखेशीं धरलें होते नाचण्याच्या वेळीं.

दर वर्षीचेच असे हे.

भूरीनें बायजेला एका बाजूला नेलें.

बायजेची परस्पराच्या विवाहाला त्यानें समति विचारली.

किती उत्सुक होता भूरी!

आज कांहीं दिवस तर बायजेची आराधना त्यानें मनःपूर्वक चालविली होती. तिचा दिल खुलवावा, यासाठीं भूरी अतोनात झटला होता.

ती लोणचाकरता कोंवळे बाबू तोडायला गेली, कीं यानें तिला मदत करावी. सध्याकाळीं कोंबडया पकडून खुराडयात डाबण्याचें कृत्यही बाय-

जेची इच्छा नसताना भूरी पार पाडी.

घरच्या बकऱ्याना पाला खायला भूरीच आणून देई.

बायजा नदीवर पाणी आणायला गेली, पोहायला कधीं कधीं पाण्यात शिरली, तरी त्या समयीही भूरी तिच्या आसपास घुटमळत असलेला आढळे.

एक ना दोन, हजार बाबी सागता येतील अशा.

तथापि भूरीला बायजेचे आपल्याविषयी चागले मत नाहीं याचा अजमास वारवार आला होता.

पूँवा त्याच्याशीं अत्यत ममतेनें वागणारा बायजेचा बाप सायसिग भूरीबरोबर सध्या भाषणही करायला तयार नव्हता.

भागऱ्याचा उत्सव समीप आला म्हणून जिच्यासाठी भूरीने आपली पहाडावरची लाकडे वाहून आणण्याची नोकरी मुद्दाम सोडली, त्या बायजेच्या वृत्तींत कमालीचा पालट पडलेला पाहून भूरीचें चित्त व्यथित होई.

अगोदरची तिची प्रेमळ वर्तणूक पार लोप पावली होती नेहमी बायजा त्याला हिडिसफिडिस करी, रागीट दृष्टीने भूरीकडे पाही, एकदा त्याला बायजा बोलली ' सदान् कदा असे लोचटासारखे मागे मागे असता माझ्या. मला नाहीं आवडत. माझ्या बापाला, सायल्याला हे खपत नाही. मैत्रीणीदेखील निष्कारण थट्टा करतात माझी. मी स्वच्छ सागते, माझे प्रेम नाही तुमच्यावर.' असें का, याचे कारण मात्र बायजा भूरीला कळवीना.

ती एवढेंच म्हणे, ' ज्याने त्यानें आपल्या मनाशीं काय ते समजावें.'

भूरीची वेडी कल्पना अशी कीं, बायजेचा हा उसना रुसवा आहे. आपली कसोटी ती बघत आहे. म्हणूनच बायजेचा पिच्छा त्यानें सोडला नाहीं.

भागऱ्यामध्ये मात्र तिच्या खऱ्या अत:करणाचा उलगडा करून घेण्याचा भूरीनें निश्चय केला.

परतु अखेर काय झालें?

बायजेनें नापसती दर्शविली. भूरी खिन्न होऊन पुन्हा नाचाच्या दगलींत आला.

बायजा उपाहासात्मक हंसत परत फिरली.

तिच्या मैत्रिणींनीं बायजेला एका बाजूला नेऊन निकाल विचारला.

छन्नी हास्य करीत तिनें सारें वृत्त कथन केलें.

इकडे भूरीने ही निराशाजनक बातमी आपल्या परिचित जनाच्या कानावर घातली.

जराशाने नाचाचा समारम आटोपला. तरुण-तरुणींचा मेळाच त्या ठिकाणीं प्रेमप्रदर्शनार्थ, जन्माच्या गाठी जमविण्यासाठी नट्टून थट्टून, शरीरे शक्य तेवढी शृंगारून, जमला होता.

काही हसत गेले. काहीं रडत गेले.

बायजा आपल्यामागची ब्याद कायमची चुकली असा सुटकेचा निःश्वास टाकीत स्मितयुक्त चेहऱ्याने स्वतःच्या गावी गेली.

अन् भूरी—पुरषासारखा पुरुप—मर्द गडी—

पण खरोखरच तो आसवें गाळीत पाय नेतील तो मार्ग आक्रमू लागला.

याच क्षणी इतक्या अवधीपर्यंत भागऱ्या नामक नाच दुरून लक्षपूर्वक निरखणाऱ्या एका ख्रिस्ती मिशनऱ्याने भूरीकडे मोर्चा वळविला.

* * *

पश्चिम खानदेशमध्ये तळोदे व शहादे या तालुक्यात पावरा नावाच्या भिल्लाची एक जात आहे

भूरी हा तिथलाच एक तरुण भिल्ल त्यानें बायजाला फार दिवसापूर्वी ती कुणाच्याशा लग्नसमारभाला आली असता पाहिले होते

तेव्हाच त्याचे मन नकळत बायजाकडे ओढले गेले होते.

पुढें त्याची आणि बायजाची योगायोगाने ओळख झाली.

सातपुडा पर्वताच्या भागात तोरणमाळ म्हणून थड हवेचे स्थान आहे.

तेथे साहेब लोक नेंहमीप्रमाणे उन्हाळयात महिनाभर राहण्यासाठी आले होते.

तोरणमाळ हें ठिकाण आहे खूप उचावर. माल चढणावरून न्यावा लागतो.

भूरी काहीं दिवस त्या कामावर होता. बायजाचा बाप सायसिंगही होता तेथे.

त्यानें अर्थात् तोरणमाळ नजीकच वस्ती केली त्या घटकेपुरती.

वास्तविक बायजाच्या पित्याचें मोठे शेत होतें स्वत:च्या मालकीचें.

त्यात पिकवलेले तादूळ, गहू, मकई इत्यादि धान्य, कोंबड्याचीं अंडीं, बकऱ्याचें मास; बस्स् चैन होती सायसिंगाची.

इतकें असूनही त्यानें साहेब लोकाचें काम पत्करलें याचे कारण म्हणजे दारूची हांव.

पावरा जातींत प्रत्येक इसमाला दारूचा भयकर नाद. पुरुष असो, स्त्री असो, अगदीं लहान अर्भक जन्मल्याबरोबर त्याच्या तोंडाला दारूचा थेंब लावण्यात येई. तेव्हापासून दारूशी त्याचा परिचय. दारूला पैसा पाहिजे. कर्ज तर कोणीच करीत नसे त्याच्या जातींत. अनायासें काम आलें मग का सोडा, असा बायजाच्या बापानें विचार केला त्या सालीं.

सायसिंगाची मुलीवर भक्ति होती. बायजा जन्मदात्याला सायला असें म्हणे. मजुरीच्या जागीं सायसिंगाला मकईची भाकरी बाधून बायजा नेई रोज.

साहजिकच भूरीच्या ती नजरेला आली. भूरीच्या अतरातील सुत भावना तरारल्या. मागें एकदां बायजेचें ओझरतें दर्शन त्यानें घेतलेंच होते.

आता तर भूरी तिला अरण्यातील अप्सराच मानू लागला.

पावरा जातीतल्या भिल्ल ललना मूळच्या सुदरच असतात. भूरीला बायजा विशेष आकर्षक वाटली तिच्या स्वभावामुळें.

भूरी स्वतः मनाचा अतिशय प्रेमळ व दिलदार; घरची शेतीवाडी होती त्याच्या. भूरीच्या बापाला तींन बायका होत्या. घरकाम करायला, शेतात राबायला, या स्त्रिया उपयोगी पडत.

भूरीच्या दोन सावत्र भगिनींचीं लग्नें झालीं. त्याच्या पित्याने घरजांवई केले. भूरीला इतरही बहीण–भाऊ होते. एकदर कुटुबाचा पसारा लक्षांत बाळगून भूरीनें शेतीचा हिस्साच घ्यायचा नाहीं असें स्वत:शीं ठरवलें. मिळेल तेव्हां काम करावें, नाहीं तेव्हा कष्ट वेंचून बापाच्या शेतावर तुकडा चघळावा, असा स्वत:चा आयुष्यक्रम भूरीनें आखला होता.

तोरणमाळला त्याला प्रथम रोजिमदारी गवसली.

अन् सुदर, सुस्वभावी तरुण मुलगी बायजा.

रूपावर कोणीही फिदा होईल; परतु गुणावर—अंत:सौंदर्यावर.

भूरीला त्याचीच मातब्बरी विशेष वाटे, म्हणूनच त्यानें बायजेला स्वत:ची जीवितस्वामिनी बनवण्याचा निश्चय केला.

बायजेचा बाप सायसिंग याला दोन भार्या होत्या. पैकीं एक त्यानें तोरणमाळेला आणली होती व शिवाय बायजेलाही तिच्या सहाय्याला घेऊन आला होता तो.

बायजा भारी आतिथ्यशील होती. एकदा भूरी सहज सायसिंगासमवेत त्याच्या झोपडीवर गेला.

बायजेनें लगेच भूरीला महूची फुलें खायला दिली. महू या वृक्षाची दारू पण प्यायाला मिळाली भूरीला.

केवळ भूरी तिला आवडला यास्तव त्याचें बायजेनें स्वागत केलें असें नव्हे.

खिस्ती मिशनरी एक दिवस आला होता. त्याचाही तसाच सत्कार झाला. चहा मिळाला मिशनऱ्याला, पावरा भिल्ल स्वत: चहा फारच क्वचित घेतो, पण पहीपाहुण्याच्या आतिथ्यासाठीं चहाच्या सामानाची सदैव सिद्धता बहुतेकाच्या घरीं ठेवण्यात येते.

आलेला मिशनरी होता आपला कोणीं गांवठी खिश्चन. स्वत:चा पहिला धर्म त्यानें जितक्या अविचारानें टाकला, तितकाच अविचार त्यानें खिस्ती धर्मोपदेशकाची कामगिरी पत्करण्यांत दाखवला.

मिशनरी लोक भिल्ल वस्तींत धर्मप्रसाराकरिता शिरकत होते हळूहळू. तोरणीमाळला बडया अधिकाऱ्यांचे सीझनपर्यंत ठाणें होतें. ओघानेंच ह्या खिश्चननें पहिल्यानें तेथें आगमन केलें. याच मिशनऱ्यानें नदुरबार व नवापूर या तालुक्यातले कित्येक भिल्ल बाटवले होतें.

उरलेल्या दोन तालुक्यांतले बरेचसे भिल्ल आपण बाटवू अशी त्याचीं उमेद.

त्याला काय माहिती, कीं हा पावरा जात आहे. उच्च संस्कृतीचे भिल्ल आहेत हे.

इतर भिल्लात दारू पाजली कीं या ख्रिश्चन मिशनऱ्याला बायकाही लाधल्या होत्या. भिल्लाच्या दारूला पैसे मिळाले, कीं ते भिल्ल ख्रिश्चन बनत आणि फिरून आपल्या जातींतल्या लोकाना ते मनसोक्त दारू पुरवीत अन् स्वतःच्या धर्माचारात सामील होत. दारू पायीं ते वाटेल तसे करतील. कोणाची खडानें जमीन कसली, तर सालदारी हे भिल्ल आधी घेत. दारूत दोन–तीन महिन्यामध्ये सारी रक्कम फस्त करीत, व शेताच्या मालकाला फसवून दूर जगलात पळून जात.

मिशनऱ्याचा तर्क असा कीं, पावरा ही भिल्लाची जात. पहिल्या भिल्लापेक्षा सुसपन्न दिसते खरी, तथापि हे लोक ज्याअर्थी दारूला भजतात, त्याअर्थी नदुरबार व नवापूर तालुक्यातल्या भिल्लाप्रमाणेच ह्याचे नैतिक अध:पतन घडले असावे.

त्यात त्याच्या मुलीही, मिशनरी ज्या तालुक्यात हिंडला होता, त्या भिल्लासारख्या काळयासावळ्या नव्हत्या, तर लावण्यमय, नाजूक, तजेलदार.

बायजाचे रूप न्याहळता क्षणीच मिशनरी स्वत:चे धर्मकार्य पूर्णपणे विसरून गेला. त्याने मनाशीं काहीं खूणगाठ मारली. भूरीवर बायजाचा लोभ जडलेला त्यानें अवलोकला, तशी भूरीबद्दलच्या आकसाने त्याला ग्रासले.

बायजा सोप्या रीतीने आपल्या जाळयात अडकेल ही मिशनऱ्याची कल्पना.

म्हणूनच तोरणमाळच्या थारेंपालटीचा समय सपला तरी धर्म वाढवण्याच्या निमित्ताने पावरा जातीच्या भिल्लातच, बायजाच्या वसतिस्थानाच्या आजूबाजूलाच, भटकण्याचे त्यानें ठरवले.

पण त्याला काय माहिती की पावरा जातीतील बायजाची मनोरचना इतकी सोज्ज्वल, चारित्र्य इतके उज्ज्वल, कीं जिकडे ती नेत्र वटारील तेथील वस्तु जळून खाक व्हावी !

× × × ×

बायजा सायसिंगाबरोबर शेतावर निघून आली.

भूरीला पहाडातलीं लाकडे एका गावात आणून पोंचवण्याचा नवीन उद्योग लागला.

रानातल्या चदनचारोळ्याही भूरी दूरदूरच्या व्यापाऱ्यांना विकी.

सवड काढुन तो बायजाला भेटे केव्हा केव्हा. बायजा शेताची राखण करीत उच झाडावर बसे.

गमतीने भूरीही लाबच्या वृक्षावर जाऊन तिच्या रखवालदारीच्या कृत्यात स्वतः भागीदार होई. बायजा मजुळ आवाजात मोठ्यानें प्रेमगीतें गाई. भूरीही तिला गाण्याच्या आलापातच उत्तर देत असे.

अशा वेळी गीतमय सवाद मोठे मजेचे होत पुढची भेट कोठे घ्यायची तेही उभयतामध्ये याच समयी ठरे . ..

भूरीच्या व बायजाच्या अत:करणात प्रणयाचा फुलोरा बहरला होता.

हे सर्व मिशनऱ्याला खपत नव्हते.

त्यातल्या त्यात मिशनरी जेव्हा खिस्ती धर्माचीं स्तुतिस्तोत्रे आळवून पावरा जातीतील भिल्ल फितवण्यास प्रवृत्त झाला, तेव्हा भूरीनें त्याला एकदा चागलाच दम भरला होता. मिशनऱ्याच्या किवा मौलवींच्या ऐवजीं भिल्लाची खरोखरच उन्नति चिंतणारी राजकारणाच्या क्षेत्रातील माणसे येतील तर उत्तम असे भूरीचे मत होते. या पूर्वी आलेल्या काहीं इसमाचे उदात्त कार्यही भूरीच्या डोळयासमोर ठळकपणे होते. ते त्यानें या प्रसगीं मिशनऱ्याला निवेदले.

आता तर दुहेरी कारणानें मिशनरी भूरीला सारखा पाण्यात पाहूं लागला.

सायसिगाकडे मिशनऱ्याच्या खूप खेपा होत. अशाच एका सधीला त्यानें बायजेच्या व साम्यसिगाच्या आतड्यात किल्मिष भरले.

उभयताना तो एकदा म्हणाला, ‘ आम्हीं मिशनरी ! धर्मप्रसारासाठीं फिरणारी मडळी ! ! तुमच्या प्रातात बरेच महिनें वावरलो, म्हणून तुमचे रीतिरिवाज ठाऊक झाले. अमुक सुखाच्या पलीकडे तुम्हाला कशाची किंमत नाहीं. धर्माची, राजकारणाची कसलीच पर्वा नाहीं तुम्हाला, तुमची भाषा अर्धवट; गुजरातीं—इंग्रजी धाटणीच्या उच्चारांचे जगली शब्द तींत इतस्ततः विखुरलेले, तुमची भांगऱ्या ही नाचाची वहिवाट चांगली आहे. थेट आ-

मच्या खिस्ती समाजांतील नाचरंगाच्या वळणावर. वधुवराना एकमेकाच्या पसतीची जी सवलत बहाल करण्यात येते तीही और आहे. परतु याचे दुष्परिणामही बरेच होतात...'

'कोणचे?' सायसिंगानें विचारलें.

'भूरीचेंच उदाहरण घ्या ना. तुम्हाकडे तो हम्मेष येतो...'

'मग?' बायजेनें कुतूहलपूर्वक पृच्छा केली.

'प्रत्येक बाजाराच्या गावीं होळीच्या वखताला भागऱ्या होतो. खरे कीं नाहीं?'

'हो' बायजा म्हणाली.

'त्या वेळी तरुणानें आपल्या विवाहाची मागणी घालायची व रुकार मिळाल्यास पुढें प्रियकरणीशीं त्याचे लग्न व्हायचें अशी चाल आहे ना?'

सायसिंगानें होकारार्थी मान डोलवली.

'एकवार लग्नाचें निश्चित ठरल्यानतर वधूवर एका ठिकाणीं राहिले तरी चालतात......'

सायसिंगानें हुकार दिला—

'भूरीनें अशाच भागऱ्याच्या मजलशींत एका तरुणीला सहचरी म्हणून निवडलें. विवाहाआधीं तिला दिवस राहिले, तेव्हा तो पळून आला इकडे.'

'काय?' बायजानें चमकून विचारलें.

'सायसिंग रागावू नका. तुमच्या मुलीच्या कल्याणासाठीं सारा प्रकार मी मुद्दाम सागितला...'

मिशनरी झट्कन निघून गेला.

'-मला भूरीची माहिती नाहीं. शहादें व तळोदें या दोन मोठाल्या तालुक्यात आपला पावऱ्याचा विस्तृत पसरलेला जनसमुदाय आहे, त्यात असेल कोणचें तरी त्याचें राहण्याचें ठिकाण! मला काहीं वावगा वाटला नाहीं तो. ऐकावें तें तें नवलच!' सायसिंगानें विचारी मुद्रा करून बायजेकडे नजर फेकली.

बायजा क्रोधानें लाल झालेली दिसली त्याला.

‘ अगोदर समजलें हें ठीक ! जवळच ठेपला आहे भागऱ्याचा सण. पुरी फसलें असतें मी ! आमचें ठरलें होतें शरीरसंबंध नक्की करण्याचें...’ बायजा दातओठ चावीत बोलली.

‘ मिशनरीबाबानें वेळेवारीच सावध केलें म्हणायचें ’ सायसिंग उद्गारला.

नतर भागऱ्याचा सणवार लवकरच उगवणार म्हणून मोठ्या आशेनें बायजाकडे प्राप्त झालेला भूरी—

त्याचा मनोदुर्ग ढासळण्याजोगें बायजाचे आचरण—

सायसिंगाचीहि भूरीच्या ठायीं वक्रदृष्टि—

भागऱ्याचा नाच अन् त्याचा खेददायक शेवट—

सारे प्रसग भूरीनें एकामागून एक अनुभवले.

आणि विलक्षण वैतागात तो जगल तुडवीत असताच मिशनऱ्याची हाक त्याच्या कर्णपथकावर थडकली.

‘ भूरी ’

‘ काय ?’ भूरी थाबला.

‘ कुठे निघालास ? ’

‘ मिशनरीबुवा, दाही दिशा सचारार्थ मोकळ्या आहेत सध्या. दारू आजपासून सोडली कायमची. उच्च ध्येयासाठी देह झिजवणार, प्राण हरपला तरी फिकीर नाहीं. ’

‘ आमच्या धर्मात ये. तुला परी मिळेल फक्कडशी. तुझे पीळदार बाहु, भरदार छाती, तुझी उची—अगसौष्ठव फार छानदार आहे तुझे. अशी नार पाहून देतों, कीं तिच्या सगतीमध्ये स्वर्गसौख्यात लोळत राहशील ! ’

‘ पुरे करा तुमची धर्मविषयक वटवट. दारू प्याली कीं स्वर्ग निर्माण होतो आमचा. बायजा हीच माझी अप्सरा—ती गेली म्हणून स्वर्गतुल्य दारूही मी तुच्छ लेखतों ’

‘ तिजपेक्षा सरस, देखणी मुलगी पाहून देतो तुला आमचा धर्म स्वीकारलास कीं...’

‘ मी वरवरच्या सौंदर्याला किंमत देतच नाहीं. अतरात जे शुद्ध निष्पाप जलाचे झरे वाहतात, त्यांचें महत्त्व मला अती आहे. निर्मळ हृदयाच्या जिदगीनें नटलेली तीच खरी अप्सरा ! माझी बायजा तशी आहे...’

‘ तुझी बायजा, हाः हा: हा: ’ मिशनरी थट्टेच्या स्वरात बोलला, ‘ तिनें तर तुला झिडकारलेच ! ’

‘ किती कगाल आहे तुमचें मन!! मी दु:खात भाजतो आहे अन् तुम्हाला चेष्टा सुचते ! अशीच का तुमच्या धर्मातील सारी माणसे आहेत ? तुमच्यापेक्षा जे राजकीय कार्यकर्ते आमच्यात येतात, ते किती तरी बरे. धर्माच्या पोकळ बडेजावाऐवजीं काहीं भरीव कामगिरी करण्याची तळमळ असते त्याना. भरमसाट दारू झोंकणे वाईट आहे, हे सत्य आमच्या गळीं उतरवण्याची पराकाष्टा होते त्याच्याकडून. आम्ही बहुतेक पावरे आमचे कापड, फक्त सूत दुसरीकडचे आणून, स्वत:च बनवतो, म्हणून आम्हाला धन्यवाद लाभतात. नुसते सुखासीन राहू नका, आत्मोन्नति साधा, चळवळे व्हा, अशी शिकवण असते राजकीय प्रांतातल्या इसमाची. बस्, ठरला विचार. इत:पर उदात्त जीवनाची शक्य तेवढी चव चाखायची. ’

भूरी तात्काळ मिशनऱ्याच्या दृष्टीपार झाला.

* * *

अल्पावधींतच भूरी हा पावरा जातींत मोठा कार्यकर्ता म्हणून समजला जाऊ लागला.

तळोदें व शहादें या पश्चिम खानदेशातील तालुक्यात दोन लाख वस्ती पावरा जातीच्या भिल्लाची आहे. उरलेला तो एक लाख पाटीदार समाज.

स्वत:च्या सुखापलीकडे कोणाच्याही परिस्थितीची याद न करणाऱ्या अशा या पाटीदारात काहीं कांही उत्कृष्ट देशसेवक निपजले होते, त्याच्यात मिसळून भूरी बरेच दिवस लोकहितार्थ राबला.

पुढें तो पावऱ्याची जागृती करण्यास्तव, आपली जनता उन्नतदशेप्रत जावी म्हणून, स्वत:च मेहनत घेण्यास सिद्ध झाला.

गावोगावच्या भिल्लाना त्यानें मदिरेपासून परावृत्त केलें.

मध्यें व्याघ्र मारल्यानें त्यावर जो तो पावरा स्तुतीसुमनें उधळी. तथापि भूरी सदा सर्वकाळ उदास असे.

भिल्लसमाज दारूच्या व्यसनातून मुक्त करण्याची प्रमुख जबाबदारी त्यानें शिरावर घेतली होती.

ठिकठिकाणी भूरीचा प्रचार सुरू होता.

तरी पण बायजेच्या गावीं तो चुकून सुद्धा गेला नाहीं.

बायजेने कुणाला माळ घातली असेल--ती चैनींत असावी का काळ-जींत ? रात्रदिवस त्याच्या अतरगात हे प्रश्न सलत होते. तिच्या दृष्टिलाही न पडण्याचा त्याचा निश्चय झाला होता. तिला पाहताच भावनाचा हल-कल्लोळ हृदयात उसळेल, मनावर आपली सत्ता टिकणार नाहीं, ही धास्ती भूरीला भेडसावीत होती.

काहीं महिन्यानतर बायजेच्या गाववाल्यांची मदिरा बद करण्याची नामी युक्ति भूरीने शोधून काढली.

त्या ग्रामाबाहेर असलेला दारूगुत्ताच हरप्रयत्नाने उठविण्याचा त्यानें बेत योजला.

बायजा दृक्पथातही न येता भूरीचा दारूबदीचा उद्देश अशाने तडीला जाणार होता.

भूरी गुत्त्याच्या मालकासमोर आपले हेतु माडण्याच्या इराद्याने एका रात्रीं गुप्तपणें बायजाच्या गावाकडे निघाला.

* * *

भागऱ्यानतर काही दिवस, भूरीला आपण नकार दर्शविला, याचें बाय-जेला समाधान वाटत होते.

सायसिगही मुलीने योग्य पथ चोखाळला असें म्हणत असे.

बायजेवर लुब्ध असलेले अनेक जवान होते. त्याना स्वतःच्या प्रेमया-चनेचा रस्ता खुला झाल्यानें, एकदर घडलेल्या प्रकारामुळे त्याच्या मुखा-वर हर्षच विलसला.

मागे सारखी सारखी ज्या भूरीची दृष्टिभेट होई, तो साप्रत बायजेला कोठेच आढळेना.

विरहाचा थोडासा चटका तिला जाणवल्याखेरीज राहिला नाहीं.

भूरीचें प्रेमार्द्र वर्तन आताशा तिला नित्य आठवे व मिशनऱ्यावर भरं-वसा ठेऊन वागण्यात चूक घडली, आणखी चौकशी व्हायाला हवी होती असें बायजेला वाटूं लागलें.

मिशनरी सायसिंगाकडे पुष्कळ खेपा टाकी.

एक दिवस बायजेनें त्याला विचारलें, ' मला दाखवता का जिच्याशीं भूरी बेइमान झाला ती मुलगी ? तुम्ही बोललेली हकीकत प्रत्यक्ष कळू द्या.'

' भूरी तेव्हां बराच लाब रहात होता इथून. तुम्ही येता मजबरोबर ? '

' नको, सायल्याला घेऊन जा. '.

सायसिगाने लेकीच्या भिडेखातर हें कबूल केले, पण मग मिशनऱ्याची अळटळ सुरू झाली.

मिशनरी लबाड असल्याचा बायजाला सशय आला व भूरीला डावलल्या बद्दल ती जास्तजास्तच खेद करू लागली

ओळखीच्या प्रत्येक व्यक्तीला ती विनवी की, भूरीची व माझी गाठ घालून द्या.

कित्येक महिने असे गेले. तिचा मरीमातेच्या ठिकाणीं दृढभाव होता. सायसिग दरवर्षी मरीमाता देवतेला बोकडाचा बळी अर्पी. आताशा रोज त्या देवळात बायजा ध्यानस्थ बसे. भूरीची भेट करवून देण्याविषयीं ती मरीमाता देवीची प्रार्थना भाकी.

एकाएकीं भूरीची कीर्ति तिच्या श्रवणात आली. झाडी तोडून पावऱ्याचें नवीन वस्तिस्थान होत होते—मध्येच वाघाचा त्रास उद्भवला, परतु भूरीनें त्या हिंस्र पशूला तिरकमट्यानें यमसदनीं पाठवले.

जिकडे तिकडे ठाऊक झालेल्या भूरीची आणखीही स्तुति तिने काहींजणाकरवीं ऐकली.

भूरीनें मद्य सोडले आहे.

पावऱ्यामधील दारूचा फैलाव ओसरावा म्हणून तो कष्टत आहे. पावऱ्यानीं कार्यविन्मुख राहू नये अशी त्याची खटपट चासू आहे...

बायजा ज्याला-त्याला भूरीचें गुणवर्णन निवेदू लागली.

एकट्या मिशनऱ्यानेंच तिला खोटें ठरवण्याचा घाट घातला. तो म्हणाला, ' या वस्तीबाहेरच्या दारूगुत्त्यात रोज रात्रीं भूरी गुपचूप रीतीनें येऊन यथेच्छ दारू ढोसतो. '

' माझी खातरजाम कराल ? '

'हो, हो, पण माझ्या सोबतीनें तुम्हीच येत असाल तर. सायसिंगावर देखील तुमचा विश्वास बसणार नाहीं. कुणी सांगावें!'

'ठीक आहे. मला घेऊन जा तिथें.'

भूरी नुसता किंचित् काल का होईना नजरेला पडावा अशी बायजेच्या मानसाची तळमळ होती.

जमल्यास भूरीची सरतेशेवटची परीक्षा पाहायची. तो सच्चा दिलाचा ठरल्यास झाल्या गोष्टीबद्दल त्याची क्षमा मागायची.

ह्याउप्पर त्याने आपणास धिक्कारले तर जगायचें नाहीं. त्याच्यादेखत मरणाला मिठी देण्यासाठीं एक विषारी वनस्पतीसुद्धा जवळ बाळगली तिनें.

बायजेला नेण्यात मिशनऱ्याचा वेगळाच कावा होता!

गुत्तेदाराला त्याने आधी पैसे चारून जागेत चिटूपाखरू नसेल अशी व्यवस्था मुद्दाम ठेवली.

भूरी आता येईल मग येईल, अशा थापा मारीत बायजेला खूप दारू पाजली त्यानें. आणि ती बेहोष बनली, तेव्हा मिशनरी तिच्या शरीराशीं लगट करण्यास उद्युक्त झाला.

अशा असहाय अवस्थेंत बायजेनें आपल्या पासल्या विषारी वनस्पतीचा आसरा घेतला.

तिनें वनस्पती चघळून घशापार गिळली. मृत्यूच्या अखेरच्या क्षणीं वेदनेनें दाह होणाऱ्या बायजेच्या देहाशीं मिशनरी अतिप्रसग करीत असताच त्याजवर कुणीतरी खवळून कोसळलें!

'भूरी!' बायजेच्या किलकिल्या डोळ्याना तिचे पचप्राण सापडले.

तोच तिचा शेवटचा शब्द!

लागलीच बायजा निश्चेष्ट झाली!

भूरीच्या नसनसातींल पावरा जात सळाळली होती, असत्य भाषणाचें देखील पातक न करणारा पावरा आपल्या भिल्लीण प्रियेशीं बेशरमपणानें वागणाऱ्यावर कुऱ्हाडीनिशीं उडी घालतो. मिशनऱ्याचें नरडें भूरीनें पळभरातच फाडफाडून टाकलें!

रक्तानें भारावलेल्या हातांनीं बायजाला त्यानें गदगदा हलवलें. सारा

प्रकार ध्यानात येताच भूरीनें बायजाच्या ओठाशीं ओंठ भिडविले आणि नतर क्षणभरानें तो पोलीस पाहऱ्याकडे धावला.

‘ मीं खून केला, मला पकडा, मला फांसावर लटकवा. !’

‘ कशाकरता घडला खून ? ’ बदुकवाल्या पोलिसाने हसत सवाल टाकला.

‘ माझ्या अप्सरेसाठीं ! ’

‘ अस्मानात लागेल तितक्या पऱ्या आहेत. जाशील लौकरच तिथे तू ’

‘ होय, इतर अप्सराच्या मेळयात माझी बायजा नक्कीच असणार. तिला हुडकून काढीन...’

‘ छे, छे ! कुठे स्वर्गातल्या देवागना, काय त्याची अगाची बेमालूम ठेवण... ’

‘ अत:करणाचे सौदर्य पहिल्या प्रथम शोधा. माझी बायजा सद्गुणाची खाण होती. सुरेखही होती ती. बायजा अतराळात रवाना झाली. तिथे मला ती भेटेल. देवलोकींच्या चटकचादण्या रूपानेंच मोहक असतील, मला भुरळ घालणारे हृदय होतें बायजेपाशीं. देहसौदर्यातही ती परीना कदापि हार जाणार नाहीं...’

जरा वेळ थाबून भूरी स्वर उचावत गरजला–’ ‘ माझी बायजा... अप्सरा...’

* * *

आणि कठाभोंवतीं गळफास दाटेपर्यत भूरी हेंच वाक्य उच्चारीत होता !

## प्रतारणा : : : १५

‘ काय माने, कालच्या बाजारात विक्रीला आलेला बैल पाहिलात का ?’

‘ हो, जो राधापुरचा आला होता तोच ना ? ’

‘ काय जनावर होतें पण ? आपल्या काहीं पाहण्यात असला सणग नाहीं बुवा ! ! ’ केवळभाईचाच तो आवाज होता.

‘ अहो, याच्यापेक्षा कितीतरी तयार अशीं दोन जनावरें माझ्या बघण्यात आहेत आणि तीं जर अजून काशीरामाजवळ असती तर...पण त्याचा विचार कशाला आता ? ’

‘ म्हणजे झालें काय त्याना ? ’

‘ ती फार मोठी गोष्ट आहे. ’ माने म्हणाले.

‘ मग सागा तरी. किती दिवसानीं तुम्ही येताहात· आमच्या दुकानात. नुक्तेच वसूल देखील घेऊन आलात, सध्या कामही नसेल, बरे, ही तपकीर तर ओढा. ’

मी केवळभाईच्या दुकानांत काहीं सामान घेण्यासाठीं गेलों होतों.

दुकानाच्या बाहेरील बाजूला केवळभाईचा गडी मला हवे असलेले जिन्नस बांधीत असतां मी तेथेच बसलों होतों. वरील सवाद कानावर पड-ल्यानतर गड्याला बाधलेले पुडे मी येईपर्यंत तसेच ठेवण्यास सांगून मी दुकानाच्या आतील भागात गेलों.

मधोमध मद्रासी काळ्या तपकिरीची बाटली उघडी होती. माने व केवळ-भाई चिमटीचिमटीने तपकीर उचलीत होते.

माने हे तलाठी म्हणून आमच्या गावात नुक्तेच बदलून आले होते.

'–काय केवळभाई, माने कसली गोष्ट सागत आहेत तुम्हाला? आम्हाला ऐकवणार कीं नाहीं?–'

' ह माने, आतां करा सुरवात ' केवळभाई म्हणाले.

मान्यानींही आढेवेढे न घेता सागण्यास आरभ केला.

' प्रथम तुम्हाला आमच्याकडील पोळाचा उत्सव म्हणजे काय याची कल्पना यायला हवी ' माने म्हणाले, ' कारण त्याच उत्सवामध्यें मीं ती बैलजोडी पहिल्यानें पाहिली. आमच्या खेड तालुक्यातील पोळाची जत्रा म्हणजे शेतकऱ्याच्या गरिबी–श्रीमतीचे एक प्रदर्शनच. बैल म्हणजे शेतकऱ्याची सोन्याची खाण. बैल म्हणजे शेतकऱ्याच्या प्रेमाचा पाइक. थोडक्यात सागावयाचें तर बैल हे शेतकऱ्याचें जीवनसर्वस्व असतें. एखाद्याजवळ पुष्कळ पैका असला व चागली जनावरे नसली तर त्याला कोणी मोजीत नाहीं. पण तेच चांगले उफाडयाचे तयार बैल असले, मग तो थोडाबहुत कर्जबाजारी जरी असला तरी इतर शेतकरी त्याच्याकडे पाहून कुजबुजतात ' बघा, याची आठ बैलाची आसामी आहे बरें का? '

आणि असा शब्द ऐकू आला, कीं शेतकरी स्वतःला महद्भाग्यवान समजतो. त्याला अस्मान ठेंगणें वाटू लागतें, आणि आपलें शेतकीचें वैभव म्हणजेच आपलीं गुरें मिरविणें हें त्याला भूषणास्पद होतें.

व याचें प्रत्यक्ष प्रत्यतर म्हणजे आमच्याकडील पोळाची जत्रा. उत्स-वाच्या वेळेला सबध तालुक्यातील बैल तयारीनें येतात. गावात एक चढाचा अवघड रस्ता असतो, त्यावरून बैलांचे गाडे पळवीत नेतात. या वेळीं उत्तम बैल कोण व साधारण कोण याची पारख होते. जे कसदार बैल

असतील, ते आपले गाडे सतत पळवत ठेवून चढापार होतात व आजूबाजूचे पाहणारे लोक अशा गाड्याची प्रशसा करतात. काहीं बैल सजवलेले असून त्याच्या पाठीवर रगानें मालकाचें नाव व कोणच्या गावचा बैल तें ही लिहिलेलें आढळतें.

या सर्व जत्रेत आर्थिक लाभ म्हटला तर एक मानाचें पागोटें एवढाच. तोही कित्येक ठिकाणीं नसतो. पण या उत्सावासाठीं, तुम्हाला आश्चर्य वाटेल, शेतकरी दोनदोन महिने खपत असतात. बैलाना विशेष काम पडू देत नाहींत, खुराक उत्तमपैकीं असतो. पोळाना शक्य तितकी रग आणतात. धनी एक वेळ स्वत:च्या पोटाला खाणार नाहीं; पण बैलाची यत्किंचितही आबाळ झालेली त्याला खपायची नाहीं.

आणि अशाच पोळाच्या जत्रेत मी काशीरामाचीं बैलजोडी प्रथम पाहिली.

काशीरामाच्या बैलाना हत्तीच्या पिलाचीच उपमा शोभली असती. तारुण्याचा जोमही त्याच्या अगात शिवशिवत होता. दोन बैलानीं चढ चढून गाडा नेणे म्हणजे भारी अवघड काम. एवढयाचकरिता चावरीचे बैल उपयोगात आणतात- त्या दिवशीं सगळया गाडयात काशीरामाच्या जोडीने टाळया मिळवल्या.

आतापर्यंत आमच्या तालुक्याला नावाजलेली जोडी एकट्या आमच्या गावच्या वेताळ पाटलाची होती. परतु त्या सालीं वेताळ पाटलाचा भाव उतरला. खेड तालुक्यात एकदर वीस एक जत्रा होतात, त्या सर्वात काशीरामाने नाव कमावलें.

आम्हीं वेताळ पाटलाला गावचे नाव घालवल्याबद्दल बोललो. वेताळ पाटील काशीरामाचीच नालस्ती करू लागला. आम्हीं म्हटलें, ' अशी नालस्ती करून काय होणार ? काशीरामाने भिवापुरचे नाव खेड तालुक्यात करून आपल्याला चीत पाडले. यदा झालें ते झाले. पण पुढच्या वर्षीं तरी काळजी घे ! '

वेताळ पाटलानें काशीरामाची निदा बद केली नाहीं. परतु शेवटीं तो म्हणाला, ' येत्या वर्षीं मी आपल्या गांवचा मान उजळतों कीं नाहीं बघा. '

पण वेताळ पाटलाचे हे शब्द खरे झाले नाहींत. जवळ जवळ पाच वर्षें वेताळ पाटील सारखी आम्हाला आश्वासनें देत होता, आणि दरवर्षी काशीरामाच्या ऐश्वर्यापुढे त्याचें तेज फिके पडत होतें.

आता मात्र गाववाल्यानीं वेताळ पाटलाला खूप चिडविलें. गावकरी म्हणाले, ' वेताळ पाटील, तुमची एवढी शेती, बारा बैलाची आसामी, उलट काशीराम कालचा पोर ! आताशीं कुठे मिसरूड दिसू लागली. अजून लग्नही झाले नाहीं. ना आई ना बाप. खडाने लोकाची शेती करतो आणि अशा पोरक्या पोरानें तुम्हाला खिजवावे ! ! वेताळ पाटील, उगीच पुढील वर्षी बघु म्हणून थापा मारू नका. तुमच्यात काय दम आहे तो कळला बरे. '

अशा प्रकारची सगळयाची बोलणीं ऐकून वेताळ पाटलाचे मस्तक भडकलें. माणसाला दोन वेळीं तूपरोटी काबाडकष्ट केल्याविना बिनतक्रार लाभत असली, कीं तो मानमान्यता कमावण्याकडे आपल्या साऱ्या शक्ति वेंचतो. वेताळ पाटीलही तूर्त प्रतिष्ठेचा पाठी लागला होता. अख्ख्या खेड तालुक्यात आपलेच बैल पोळाच्या जत्रेत प्रामुख्याने चमकावेत ही त्याची ईर्षा बराच अवधीपर्यंत सतत टिकली, तथापि काशीरामानें अलीकडच्या काहीं सालात वेताळ पाटलाची झळाळी मालवून टाकली होती.

हें वेताळ पाटलाच्या चित्तात अतिशय खवखवतच होते. आधी तो स्वभावाचा चिडखोर ! त्यात त्याला लोकानीं डिवचला, मग काय ?

तो विचार करू लागला.

अखेर त्यानें एक तोड काढली. काशीरामासारखी आपल्या बैलाची जात नाहीं, कितीहीं तयार करू म्हटले तरी त्याच्या नेहमींच्या हाडापेरात फरक होत नाहीं. तेव्हा काशीराम मागेल ती किंमत देऊन त्याची जोडी खरेदी करावी असा त्यानें बेत केला.

त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सकाळीं एक मनुष्य भिवापुरला रवाना झाला.

पण त्याच्या हातीं उत्तर आलें कीं, काशीराम बैल विकायला तयार नाहीं.

काशीराम म्हणाला होता, ' माझ्याकडे तुमच्यासारखीं पुष्कळ गिऱ्हाइकें आलीं; पण बैल म्हणजे माझे प्राण आहेत. मी ते केव्हाही विकणार नाहीं.'

अशा रीतीनें वेताळ पाटलाची मसलत फसली.

काशीरामाकडे धाडलेला गडी निरोप सागून गेला न गेला तोच त्याची पधरा सोळा वर्षांची मुलगी चद्रा आली व म्हणाली ' बाबा, या मुली बघ म्हणतात कीं, तुझ्या बापाने गावाचे नाव गमावले.

वेताळ पाटील चद्राचे बोलणे ऐकत होता की नाही कोणाला ठाऊक! पण तिला पाहता क्षणी त्याच्या निराशेनें काळवडलेल्या तोडावर आशेचा किरण दिसू लागला हे नक्की

कारण लगेच त्याने आनदभराने टाळी वाजवली व मोठ्यानें म्हटले, ' हा, असेच केले पाहिजे.'

' कसे बाबा ? ' चद्राने विचारले.

' तुझे लग्न काशीरामाशी केले पाहिजे ' वेताळपाटील बोलला, ' आणि फक्त सुपारी फोडून लग्न नाही, तर शहरातल्यासारखे, आपल्या गावात भिकारामानीं केले आहे ना, तसे प्रेम बसून लग्न झाले पाहिजे. काशीराम जावईही चागला आहे '

आमच्या गावदाल्या भिकाराम वकिलानी नुक्ताच प्रेमविवाह केला होता. ज्याच्या हकीकती गावात महशूर होत्या, त्याला अनुलक्षून वेताळ पाटलाचे हे उद्‌गार होते.

दोन-तीन दिवसानीं वेताळ पाटील भिवापुरात राहायला गेला.

चद्रेची व काशीरामाची ओळख झाली ती अशीः

त्या वेळीं काशीराम शेत नागरीत होता. चद्राने अगोदर काशीरामाचे शेत पाहून ठेवले होतेंच.

नागरीत असलेल्या वावराशेजारींच भली थोरली अजीराची बाग होती. दाट लिंबाऱ्याचीं झाडें बागेच्या कडेनें कुपणासाठी म्हणून लावली होती.

चद्रा पाऊलवाटेनें उन्हातान्हाची आली. तिनें काशीरामाच्या शरीराची डौलदार ठेवण न्याहाळली व नांगराला जुपलेले बळकट बैलही तिनें एकवार निरखले

सरळ चद्रा विहिरीवर गेली व पायऱ्या उतरू लागली.

हें लक्षात आल्याकारणानें काशीराम नांगर सोडून तिकडे धावला.

‘ का हो, विहिरींतशा उतरता ? ’ त्यानें विचारलें.

‘ मी दमलें आहें. पाणी प्यायचें आहे मला. ’

‘—एवढेंच ना ! मग विहिरीचें पाणी नका पिऊ. आज दोन दिवस मोट धरली नाहीं मीं. सगळें शेवाळ तवगलेलें दिसत नाहीं पाण्यावर ? ’

‘ तान्हेलीच जाऊ म्हणता परत...’

‘ छट्, माझी आडोशाची जागा आहे तिथे चला; मडक्यातलें गार पाणी प्या हवे तेवढे ’—असे म्हणून काशीरामानें चद्राला अजीराच्या बागेत नेले.

‘ काय सुंदर अजीर आहेत हो ! ’ पाणी प्राशन केल्यावर चद्रा इकडे तिकडे नजर टाकीत म्हणाली.

‘ होय, तुम्हालाही दिले असते, पण त्यावर आता माझी सत्ता नाहीं. ’

‘ कुणाची आहे ? ’

‘ बागवानाला वोपून टाकलीं बाग सारी. माझा काहीं धडे फळावर हक्क होता. तीं अजिरे मी घेऊन मोकळा देखील झालों, तरी पण...’

‘ मला तहान शमवायला विहिरीवरच जाऊ द्यायचें होतें. अगोदर फळें दाखवायची अन्...तोडा ना हो चारसहा अजीर ! बागवान् काही कातवायचा नाहीं तेवढ्यानें...’

‘ लबाडीचा साफ तिटकारा आहे मला...थाबा थोड्याशा, आलोंच मी बागवानाला विचारून. तो असेलच इथे जवळपास...’

काशीराम गेला. पण इकडे...

पलीकडल्या वावरात नुकतेच कडवळ उगवत होते. कडवळाचें गवत म्हणजे बैलाचें आवडतें खाद्य—त्या दिशेलाच काशीरामाचे बैल झुकलेले चद्रानें पाहिले.

बैल नागराला जखडले होते खरे, तथापि आधींच फाळानें भुसभुशीत केलेल्या जमिनींतून नागर सहज ओढता आला बैलाना.

कडवळ खावून बैल काशीरामाचें नुकसान करतील या जाणीवेनें चंद्रा

त्या जनावराना आवरण्यास सरसावली.

परतु झाला अनपेक्षित प्रकार! बैलाचा कासरा घट्ट धरला चद्रानें; पण तिच्या प्रयत्नाचा अणुभरही उपयोग न होता चंद्राच फरपटत ओढली गेली!

नांगराच्या खुटावर तिचें डोकें आदळलें.

तळमळत ती ओरडणार तोंच—

'हें काय? तुम्ही का म्हणून धावलात?' काशीरामानें एकदर प्रकार दृष्टीला पडताच पळत पळत येऊन आधीं बैल थाबवले.

नतर चद्राला बसती करून तो पुन्हा म्हणाला, 'बैल कडवळात जात होते हें खरें! तिथे त्यानीं धुडगूस घातला असता, तर माझा तोटाही झाला असता, पण तुम्ही...फार लागलें वाटतें तुमच्या कपाळाला' काशीरामानें चद्राचें कपाळ चाचपीत पृच्छा केली, 'काहीं विशेष नाहीं ना? —कुकू पुसटलें तेव्हढेंच...'

'काय?' चद्रानें किंचित् विचकून विचारलें.

'त्यात काय हो! कुकू वाढवलेले दिसतें आहे. घरीं गेलात कीं लावा...ह, हे घ्या अजीर...सावलीला येता का जरा...' काशीरामानें गडबडींत मध्येच फेकून दिलेले अजीराचे गाठोडे चद्राच्या हातीं दिलें व दोघेही बागेतील सावलींत गेलीं.

आणि अशाच परस्परांच्या कैकदा भेटी झाल्या.

चद्रेचे लाघवी बोलणें, तिजकडून हेतुपूर्वक करण्यात येणारी नेत्रपल्लवी यानीं काशीराम तिच्या मनातील भाव उमगला.

किती झालें. तरी काशीरामाचें तरुण हृदय होतें. तो चद्रावर निस्सीम प्रेम करू लागला व एक दिवस सध्याकाळच्या वेळेला तो शेतातील काम आटोपून पडाळींत बसला असताना रोजच्याप्रमाणें चद्रा त्याला पिण्यासाठीं दूध घेऊन आली. तेव्हा त्यानें तिच्यापाशीं विवाहाची गोष्ट काढली.

चद्रेनें काशीरामाच्या प्रेमाविषयीं शका घेतली. तेव्हा काशीराम म्हणाला, 'तुला सशय येत असेल तर माझी परीक्षा घे. तुजकरतां वाटेल तें दिव्य करतों कीं नाहीं बघ!'

' पाहा ह, तुम्ही सरळ स्वभावाचे आहात असें भिवापुरात म्हणतात ते कितपत खरे आहे, दिसेलच आता. '

' तुझ्या मनात किंतु यावा अशी तर माझी काहींच वागणूक नाहीं ! '

' पण परीक्षेला तयारी आहे ना तुमची ? '

काशीराम कबूल झाला.

दुसऱ्याच दिवशीं सकाळीं त्याने वेताळ पाटलापाशीं चंद्रेच्या सांगण्यावरून विवाहाचा विषय काढला.

पाटलाने हुंडा म्हणून त्याची प्राणप्रिय बैलजोडी मागितली.

काशीरामाने हे अमान्य केले.

पण त्याच दिवशीं संध्याकाळी काशीराम बैलजोडी देण्याला तयार झाला ! चंद्रेने त्याला त्याच्या शब्दाची आठवण करून दिली होती.

काशीरामाला हो म्हणताना मरणप्राय दुःख होत होते, पण चंद्रेचा आपल्यावरील जीव आणि आपण तिच्यासमक्ष तोंडावाटे उच्चारलेला शब्द हीं डोळ्यापुढें ठेवून त्याने जिवापलीकडे जतन केलेली बैलजोडी वेताळ पाटलाला बहाल केलीं.

काशीराम व चंद्रा विवाहबद्ध झालीं.

दुसरे दोन किरकोळ बैल काशीरामाने विकत घेतले व आपला शेतीचा धंदा सुरू ठेवला. त्याची चंद्रा ही दौलत होती. तिच्या प्रेमाकरिता आपण स्वार्थत्याग केला म्हणून स्वतःला तो धन्य समजत होता.

पण त्याचा आनंद अवलोकून चंद्रा आतून कष्टी होऊं लागली. काशीरामाचा स्वभाव तिला सहवासामुळें चांगला पटला होता. तिला वाटे आपल्या पतीशीं आपण कपटानें वागलो हे बरें केलें नाहीं. तिच्या मनाला एक तऱ्हेची रुखरुख लागून राहिली होती.

इकडे वेताळ पाटलानें नेलेली बैलजोडी दिवसेंदिवस खराब होऊं लागली. बैलांना खाणे भरपूर असलें, तरी काशीरामासारखी प्रेमळपणाची वर्तणूक नव्हती तेथें. शिवाय काशीरामानें ती जोडी बाळपणापासून पाळली होती. त्यामुळें बैलांचेंही धन्यावर असीम प्रेम होतें; ही बाब वेताळ पाटलाला चांगलीच समजून आली.

लग्न झाल्यावर चार महिन्यानीं चद्रा माहेरपणाला आली असता तिनें बापाला वळूची जोडी परत देण्याविषयीं सागितले. वेताळ पाटलानें तात्बडतोब मान्यता दिली.

चद्रा बापाच्या दोन गड्यानिशीं बैल घेऊन आली. काशीरामाला पाहून बैल प्रेमानें हबरले. काशीराम जोडी स्वीकारायला तयार होईना; तो म्हणाला, ' एकवार माझा शब्द गेला तो खरा ! '

शेवटीं चद्रेनें त्याला मनात डाचत असलेली सर्व हकीकत निवेदली व त्याला बैलजोडी परत घेण्याबद्दल तिनें विनविलें.

पण या हकीकतीचा परिणाम मात्र दुःसह झाला. काशीरामाच्या निर्मळ मनाला चद्रनें आपल्याशी कपट केले हे मुळीं सहनच झाले नाही.

त्या सबध दिवसभर तो घरात विचार करीत होता.

चद्रेने किती काकुळती भाकली, पण तो जेवलाही नाही. इतकेच नव्हे तर पाणीसुद्धा प्याला नाहीं.

आणि दुसऱ्या दिवशी सगळ्या भिवापुरात बातमी पसरली कीं काशी-राम गावातून नाहींसा झाला.

चद्रा बापाकडे आली. वेताळ पाटलानें काशीरामाचा खूप तपास केला पण पत्ता लागला नाहीं.

पाटलाचा आग्रह असतांही चद्राने म्होतूर लावला नाहीं.

तिने काशीरामाचा ध्यास घेतला. ती झुरणीला लागली.

काशीरामाच्या बैलजोडीची तिने त्याजसारखीच जोपासना ठेवली. परंतु धन्याप्रमाणे बैलही तिच्यावर रागावले कीं काय कोणाला माहित ? ते पुन्हा कधींच सुधारले नाहींत.

त्या वर्षीच्या पोळाच्या उत्सवाला सबध खेड तालुक्यात जेथें जेथे जत्रा झाली तेथें तेथे काशीरामाचे नाव ज्याच्या—त्याच्या तोंडी ऐकू येत होतें.

चद्रानें हट्ट धरून वेताळ पाटलाला फिरून केव्हांच उत्सवांत भाग घेऊ दिला नाहीं...' इतकें बोलून माने बाटलीतील तपकिरीचा आस्वाद घेण्यात गर्क झाले.

**गगनाला ग...९.**

एवढयात दुकानातील घडयाळामध्यें दहाचे ठोके पडले. मी येऊन तब्बल दीड तास लोटला होता.

माने व केवळभाई बसण्यास आर्जवून सागत होते तरी मी उठलोंच आणि सामान घेऊन घराकडे निघालों.

' काशीराम हा शुद्ध प्रेमाचा पुतळा' मीं आपल्याशींच म्हणालों 'निरागस प्रीतीपायीं त्यानें त्याच्या दिलाचे दोस्त असें बैलही दिलेन. आणखी अशा स्वार्थत्यागाला रतिभरही प्रतारणा कशी खपावी ? '

लगेच माझ्या मनापुढें प्रश्न उभा राहिला ' खरेच, काशीराम आता काय करीत असावा ? का...चद्राला कायमचा पारखा होताना तिच्या भाळींचा कुकुमतिलकही घेऊन गेला तो ? '

माझ्या जिव्हारीं उपजलेलीं ही शका अद्यापपावेतों तेथेंच घर करून बसली आहे.

# हुरड्याची मेजवानी : : : १६

कणसाच्या झोताबरोबर जोंधळयाच्या ताटाना लटकलेलीं कोंवळीं कणसें डुलक्या खात होतीं. सहज पाहणाराचीं नजर फाटेल इतकें तें मोठें पीक होतें. म्हणूनच ज्वारीचीं रोपें हेलावलीं कीं, क्षणभर सारा जमिनीचा पृष्ठभाग हालत असल्याचा भास होत होता.

शेताचा धनी माणिकराम हा वाटेकऱ्याशीं बोलत जोंधळयाच्या मध्यभागीं जी पायवाट होती तींतून चालत होता. वाटेकरी त्याच्या मागोमागच येत होता. वाटेंत येणारीं शाळूचीं ताटें अलगद बाजूला करून माणिकराम रस्ता आक्रमीत होता. हें कृत्य अगदीं साधें होतें; पण तें करतांनासुद्धा त्याच्या हृदयात साठलेला आनद चेहऱ्याच्या द्वारें ओसडलेला त्याच्या वाटेकऱ्याला दिसत होता.

असें पीक त्याच्या शेतात पूर्वी कधीं आलें नव्हतें अशातला भाग नाहीं. आज कित्येक वर्षें तो शेतीचा धंदा करीत होता. सध्या उभ्या असलेल्या उत्पन्नाहून सरस पीकपाणी पाहण्यास त्याचे नेत्र सरावलेले होते.

एकदा तर असे झाले की, एक सिनेटोन कपनी शूटिंगसाठी म्हणून जवळपास आली होती. तिनें माणिकरामचेंच शेत दृश्य घेण्यासाठी निवडले. पुढे, घेतलेला देखावा फारच सुदर वठल्याचे वृत्त माणिकरामाला सागण्याकरिता कपनीचा मालक मुद्दाम माणिकरामाकडे आला होता. व तेव्हापासून दोघाची मैत्रीही जमली होती.

तात्पर्य हें कीं, विशेष आनद होण्याजोगी नवीन घटना काहीच घडून आली नव्हती, तरीही यदाइतका आल्हाद माणिकरामाला क्वचितच झाला असेल. कारण परपराच तशी घडून आली होती.

गेलीं चार वर्षे माणिकरामाने एक बेत करावा व तो हटकून फिसकटावा असा क्रम होता, एका वेळेला पावसाचा अतिवर्षाव झाला, एक साल शेताला राखण ठीक नसल्यामुळे तोडलेलीं कणसे चोरीला गेलीं, तर एकदा विषारी रोग आल्याकारणाने त्याला नुकसान पोहोंचले होते.

जेमतेम पोटापुरते दाणे येत होते, नाहीं असे नाहीं, पण ते माणिकरामाच्या मेहनतीचे माप पदरात घालण्यास फारच अपुरे पडत होते. मागील चार वर्षांत, वावरामध्ये बिया टोबताना माणिकराम ज्या ज्या उमेदी धरी, त्या सर्व उत्पन्न हातीं येण्याच्या दिवसात भुईला मिळत.

आजूबाजूच्या शेतकऱ्याची सुस्थिति पाहून व आपल्याच नशिबीं निराशा येते हे प्रत्ययाला येऊन माणिकराम व त्याची पत्नी हताश होत असत. नशिबाचा फेरा आला आहे असे त्या दोघाच्या राहून राहून मनांत येई.

ऐन तरुणदशेत प्रयत्नाची कास धरणारा, दैवी आपत्तीना भीक न घालणारा माणिकराम आता नेमानेमाची भाषा वापरू लागला होता.

दोघांही नवराबायकोनें खूण गाठ बाधली होती. आपल्या मुलीचें लग्न व त्यानतर तिच्याशीं झालेली कायमची ताटातूट हेंच सर्व विपत्तीचें मूळ अशी त्याची खात्री झाली होती. मुलीचा विवाह झाल्यानतर ओळीनें चार वर्षे ओढवलेल्या ग्रहाना माणिकराम तोंड देत होता.

अतःकरण विषादयुक्त असल्यामुळें शेताची त्यानें योग्य पूसतपास घेतली नाहीं; सहजच त्याच्या सरकत्यानेंही ढिलाई दाखविली. यामुळेंच

येणारीं जाणारीं गुरें पीक खात असता त्याना कोंडवाड्यात पोचविण्याची तसदी घेतली गेली नाहीं; चोरानीं खळ्यावरून कणसें लाबविलीं, तरी त्याची योग्य चौकशी झाली नाहीं.

शरयू त्याची एकुलती एक मुलगी नव्हती. तिच्या पाठीवर माणिक-रामाला एक मुलगा झाला होता. पण तो अल्पावधींतच कालवश झाल्या-मुळे शरयूभोवतीच तिच्या आईबापाचा सारा जीव घोटाळला होता.

माणिकरामाचा मेहुणा पाचगणीच्या इग्रजी शाळेत मास्तर होता. मुलाची त्याला हौस होती. त्याना निरनिराळे प्रश्न करून त्याची जिज्ञासा चापसून पाह्यचा त्याला चाळा होता.

तो एका सुटींत माणिकरामाकडे आला होता. आपल्या भाचीची लौक रच त्याला ममता जडली. शरयू स्वरूपवान होती. ती बुद्धिमान असल्या-चाही तिच्या मामाला सुगावा लागला त्याने आपल्या बहिणीला व माणिकरामाला गळ घालून, त्याना शिक्षणाचे महत्त्व समजावून देऊन, शरयूला पाचगणी येथे शाळेत घालण्यासाठीं नेले.

शरयूने अभ्यासात चागलीच प्रगति करून घेतली. मैत्रिणींच्या जजा-ळात ती नेहमी असे. सुटीच्या दिवसापैकीं फारच थोडा काळ ती आपल्या गावीं राही. तिच्या आईला शरयूला कोठे ठेऊ आणि कोठे नको असें होऊन जाई. आईला टाकून घरातून जाणे तिला अशक्य होते. म्हणूनच माणिकरामासमवेत शेतामळ्यावर फिरण्याची इच्छा असूनही शरयूला तसे कधीच करता आले नाही.

शरयू इग्रजी सहावीत असतानाच एकदा शाळाखात्याच्या तपासणी-करिता एज्युकेशनल इन्स्पेक्टराचे आगमन झाले होते. पूर्वीच्या शाळा तपासनीसाची बदली होऊन या वर्षी नवीन इन्स्पेक्टर त्या जिल्ह्याला आले होते.

पाचगणीच्या शाळेत त्या वेळीं शरयूचे मामा असिस्टट हेडमास्तरच्या हुद्यावर होते. हेडमास्तर तूर्त रजेवर गेल्यामुळें शाळेचा ताबा त्याच्याकडेच आला होता. इन्पेक्टराचा दोन दिवसापुरताच मुक्काम होता. साहजिकच शरयूच्या मामानीं केलेल्या विनतीला इन्स्पेक्टरसाहेबानीं रुकार देऊन

त्याच्याकडे आपलें प्रस्थान ठेवलें. बरोबरच त्यांचा मुलगा कल्याण हाही आला होता. दुसऱ्या एल्एल्. बी. ची परीक्षा नुक्तीच सपल्यामुळें त्याला येतां आले होतें.

शरयूला पाहताक्षणींच कल्याणचें तिच्यावर मन बसलें. त्यावेळीं त्यानें ही गोष्ट वडिलापाशीं बोलून दाखवली नव्हती. परतु दुसऱ्या एलएल्. बी. चा निकाल लागून जेव्हा तो पहिल्या वर्गात पास झाल्याचे समजलें, तेव्हा त्यानें आपल्या हेतूची परिस्फुटता पित्याजवळ केली.

कल्याणचे वडील नव्या मताचे होते. त्याना सून पसत होती. पैशाची आडकाठी मुळींच नव्हती. त्याना स्वतःला हजार रुपये महिना मिळत होते.

शरयूच्या आईबापाना विवाहाच्या स्थळाची बातमी तिच्या मामाकडून कळली. पदवीधर जावई व लक्ष्मीनें गजबजलेलें ठिकाण अनायासें चालत आलेले पाहून साऱ्यानींच हर्ष केला. माणिकरामानें गावीच लग्नाची आरास उडवून देण्याचे नक्की ठरविलें. हुड्याची रोख रक्कम आयत्या समयास उभी राहणें त्याला थोडं जड वाटत होते. पण व्याह्याकडची कोणत्याही प्रकारची तक्रार नसल्यामुळे मगल कार्यात विघ्न येण्याविषयींच्या माणिक-रामाला डाचत असलेल्या सर्व शका व्यर्थ ठरल्या.

विवाह परस्पराच्या समतीनें व्हावा कीं नाहीं याबद्दल शरयूचें मत एकानेंहीं विचारले नव्हतें. तरी देखील एकदर नूरावरून स्थळ तिला मान्य आहे असा प्रत्येकाला सहज तर्क बाधता आला असता.

कल्याण हा एक काव्यसृष्टीत विहार करणारा जवान होता. आयुष्या-सबधीं फार रम्य कल्पना त्याने उराशीं बाळगल्या होत्या. सुदैवाने तो बाल्यापासून ऐषआरामास वाढल्यामुळें त्याच्या स्वप्नसृष्टीला धक्का बसेल असें काहींच घडून आलें नव्हतें.

माणिकरामाच्या गावीं झालेल्या लग्नानें मात्र खेडुताचें काव्यमय आयुःचित्र रगविण्यात आपल्या मनानें ढोबळ चूक केली असें तो मानू लागला. सासूमासऱ्यानीं राखलेली आदब कल्याणाच्या पसतीला आली नाहीं.

शरयूच्या सौंदर्याबरोबर तिची जेथल्या तेथें वागणूक अवलोकून कल्या-

णानें तिला सहचारिणी निवडलें होतें. तथापि आईबापांची मुलीच्या विरुद्ध टोंकाला असलेली खेडवळ राहणी त्याला चमत्कारिक वाटली. शरयू शिकलीसवरलेली, तर तिचे आईबाप शेतीचा उदीम करणारे, हा भेद ध्यानात घेण्याइतका विवेक कल्याणनें धरला नाहीं. कल्याणचे मातापितर समजस होते, पण स्वत: कल्याण स्वप्नातच निर्माण होणाऱ्या मनोज्ञ वस्तूभोंवतीं गुजारव करणारा तरुण होता. विवाहानिमित्तानें माणिकरामाच्या घरीं तो उतरला असता वाड्याचीं दालनें ओलाडताना काहीं ठेंगण्या दाराच्या चौकटी कल्याणास येता-जाता लागल्या. गांवातील खडबडीत मार्गानें चालण्याचा प्रसंग आला, तेव्हा ठेच लागून दोनदा त्याचा आगठा हुळहुळा झाला; माणिकरामाचा मळा पाहण्याकरिता म्हणून तो गेला असता काट्याच्या झाडानीं कल्याणच्या कोऱ्या धोतराचे वाभाडे काढले.

या सगळ्याचा परिणाम असा झाला कीं, कल्याणच्या, खेडींपाडीं, त्यातून वस्तीस असणारे मळकट पेहरावाचे लोक व शेतीवाडी या बाबतींतल्या कल्पना सपूर्ण पालटल्या.

* * *

अद्याप मुनसबीची जागा रिकामी नव्हती, म्हणून तीनतीन चारचार महिने जे कोणी रजा घेतील, अशाच्या बदली कल्याणची नेमणूक होत होती.

कल्याण पुष्कळच तालुक्याचीं गावे हिंडला होता.

शरयूच्या आईबापाचा जावयाचे कोडकौतुक करावें असा मोठा मानस होता. त्यानीं पत्रानें जावई व लेक या उभयताना गौरवपूर्वक अनेकदा बोलावलें. परतु शरयूचें मध्यतरी एकदा जें उत्तर आलें, ते माणिकराम व त्याची बायको याच्या उत्साहावर विरजण घालण्यास समर्थ ठरलें. आपल्या पतीचे सासुरवाडीच्या गावाविषयीं आणि खुद्द सासरा व सासू याच्या राहणीसबधी जे आक्षेप होते, ते शरयूनें स्पष्टपणें पत्रात माडले होते. एकट्या शरयूला माहेरपणासाठीं पाठविण्यास कल्याणाचा नकार आहे असेंही माणिकरामाला लेकीच्या चिठीवरून समजलें.

माणिकराम व व त्याची बायको आता मुलगी चागल्या घरीं पडली एवढ्यातच सतोषी होण्याचा यत्न करू लागलीं.

कल्याणच्या पेन्शन घेऊन स्थायिक राहिलेल्या बापाकडून माणिकरामाला आपल्या जावयाचा पत्ता कळे. तालुक्याला वरचेवर बदलून येणाऱ्या मामलेदारात काहींजण अति सज्जन स्वभावाचे असतात एक मोठा वतनदार या नात्यानें माणिकरामाला या अधिकाऱ्याशीं कसलाही सकोच न धरता बोलता येई. या वजनदार अम्मलदारात आपल्या जावयाशीं ओळखदेख असलेला एखादा तरी त्याला आढळेच. शरयूचें कुशल कळवून घेण्याचा हा एक माणिकरामाचा मार्ग होता.

माया वेडी असते म्हणतात. सापडेल त्या उपायानें माणिकराम आपल्या जावयाची खबर काढीत होता. शरयूच्या नवऱ्याशीं आपले काहीं कारण नसता बिनसतें ही बाब त्याला व त्याच्या बायकोला लागून राहिली होतीं. अत:करणातील व्यथा कल्याणच्या मात्यापित्यासमोर उघडी करावी व जावई ताळ्यावर आल्यास पहावे असें माणिकरामाच्या कधी कधीं मनात येई, पण त्यानें तसे केव्हाच केले नाहीं. आपले व्याही व त्याचे कुटुब हीं नव्या धर्तीनें वर्तणारीं आहेत, मुलावर त्याचा असावा तसा वचक नाहीं, परतु ते आपला बोज राखून आहेत हे माणिकराम जाणून होता.

दर दिवाळीच्या सणाला जावयाकडे फराळाच्या जिनसाचे डबे पोष्टानें पाठविले जात. परतु ते तसेच माघारी येत. दिवाळसण पुन्हा धाडले जाऊ नयेत असा कल्याणाच्या या वर्तनात स्पष्ट अभिप्राय होता, तरीही एकच लेकरू व जावई याच्या जिव्हाळयानें आधळे झालेले शरयूचे आई बाप योग्य बोध न घेता दरेक दिवाळसणानतर तिळवणासाठीं शरयूच्या नवऱ्याला नेमानें निमत्रण करीत होते.

कल्याणला गावढळाचा तिटकारा होता. तालुक्यात जरी तो मुनसब होता, तरी सामान्य गावकऱ्याशीं त्याची वागणूक विलक्षण फटकून होती. स्वत:च्या राहत्या घराची सजावट तो थेट शहरासारखी ठेवी. पैसा भरपूर होता, तेव्हा चाहेल तसें वर्तणें कल्याणला अवघड झालें नाहीं.

शहरगावीं असताना एके समयीं शरयू व तो बोलपटाला गेलीं होतीं.

कल्याण देशी चित्रपट सहसा पाहत नसे. परतु ही फिल्म बरीच गाजल्या-कारणानें शरयूला जोडीला घेऊन त्यानें ती पाहिली. सदर बोलपटात एका सीनची अति वाहवा होत होती. तो देखावा एका ज्वारीच्या पिकाने आच्छादलेल्या जमिनीचा होता, शेताच्या मधील भागीं किंचित् उच असलेले विहिरीचें थारोळें, बाधावरचीं नाना तऱ्हेचीं झाडे, सभोंवारचें माळरान व त्यातील गुराचे तांडे, सर्व काहीं मोठे मनोरम दिसत होतें. सर्व जणानीं ते दृश्य पाहून टाळ्या वाजविल्या. कल्याणही त्यात सामील होता.

हे पाहून शरयू बोलली ' म्हटल, माझ्या बाबांच असच शेत आहे; प्रत्यक्षाचा द्वेष करायचा अन् या चित्राला टाळ्या द्यायच्या.'

वास्तविक कल्याणला माणिकरामाच्या शेताची धड स्मृति नव्हतीच; तरीसुध्दा तो खिजविल्यासारखे हमून म्हणाला ' तुझ्या बाबाच शेत ना ! या सीनमधल्या शेतात जितकीं शाळूचीं कणस आहेत, तितके त्यात काटे-कुटे आहेत. स्वत:च नव धोतर फाटल्यामुळ माझे उद्गार अनुभवाच्या पायावर उभारलेले आहेत '

शरयूचा आईबापाकडे ओढा होता. त्याची तरफदारी करण्याची ती शक्य तेवढी शिकस्त करी. पण कल्याणच्या खुबीदार वाक्यानीं बहुतेक वेळा तिला निरुत्तर व्हावे लागे.

× × ×

माणिकराम व त्याचा वाटेकरी चालत बोलत तिळाचे वाफे लावले होते तेथे आले. वाफ्याकडे दृष्टि जाताच म्हाताऱ्याची मुद्रा उद्वेगाने व्यापली गेली. जरा वेळ विचार केल्यासारखे माणिकरामाने केले व एकदम आपल्या शेत्याकडे वळून तो म्हणाला, ' जा, आपले दोन महिन्यापूर्वी बदलून आलेले मामलेदार तालुक्याच्या गावाला आहेत की नाहीं याचा तपास घे. असले तर सगळी कुटुबातली मडळी घेऊन हुरडा खायला या म्हणाव त्याना ! '

वाटेकरी माणिकरामाला रामराम करून निघाला. पण पुन्हा त्याला बोलावून माणिकरामानें म्हटलें, ' मामलेदारसाहेबाना आमंत्रण देण्याचें काम मी करीन. ते आहेत कीं, फिरतीवर गेले, एवढाच शोध कर.'

मामलेदार गावींच असल्याचा वाटेकऱ्यानें निरोप आणला. मग माणिकराम बोलावणें करायला गेला. मामलेदारांचा मनमोकळा व खेळीमेळीचा स्वभाव माणिकरामाला अत्यत प्रिय होता. मामलेदाराचा व कल्याणराव मुनसबाचा परिचय असल्याची बित्तबातमी त्यानें मामलेदार-मजकुराच्या तोंडून आधींच काढली होती.

माणिकरामानें अत:करणांतलें शल्य निवेदून सासुरवाडीचा व जावई-बुवांचा सलोखा करून देण्याची मामलेदारापाशीं याचना केली व आपला मनोदय सागून टाकला.

मामलेदारानीं त्याला तत्काळ समति दर्शविली.

नतर माणिकराम ज्या सिनेटोननें त्याच्या शेताचें चित्रीकरण केलें होतें त्या कपनीच्या मालकाकडे गेला. कपनी पुष्कळ लाबची होती. पण माणिकरामाला आपल्या जावयाच्या मगदुराची एक-दोन मडळीं पाहिजे होती.

सिनेटोनच्या मालकाकडूनही माणिकरामानें सहकुटुब हुरडा खाण्या-साठीं केलेले निमत्रण आढेवेढे न घेता स्वीकारले गेले.

× × ×

मामलेदार पत्नीसह माणिकरामाच्या शेतावर आले होते, खेरीज कल्याण व शरयू हीं त्याच्या जोडीला होतीं. फिल्म कपनीचे मालकसुद्धा आपल्या कुटुबाला घेऊन मोटारीनें ठरल्यावेळीं प्राप्त झाले.

माणिकरामाचा वाटेकरी गड्याच्या मदतीनें सर्वांची बरदास्त ठेवीत होता. बसायला मऊ मऊ गाद्याची योजना करण्यात आली होती. हुरड्याचीं कणसें तोडलीं गेलीं होतीं. तीं भाजल्यावर सोबत खाण्यासाठीं, दहीं, भाजक्या शेंगा, खोबऱ्याची चटणी इत्यादि साहित्य तयार होतें.

सिनेटोनच्या मालकानें मामलेदाराशीं व कल्याणशीं ओळख करून घेतली व बोलाचालींत त्यानें आपला लोकप्रिय चित्रपट नावाजण्याचें कारण या शेतांतील देखावा हें होय असें सागितलें. सहजगत्याच सिनेटोनच्या मालकानें माणिकरामाचें नांव बहुमानानें उच्चारलें

त्या क्षणीं मामलेदाराची चर्या किंचित् चिंतातुर झाली. मुनसबांची

चलबिचल होते कीं काय, याची त्याना धास्ती पडली. पण तसें झालें नाहीं. कल्याणनें एकवार शरयूकडे नजर दिली. तीही त्यावेळीं कल्याणकडेच पाहात होती. दोघेंही मग तो शेताचा देखावा हिंडून न्याहाळण्याचा इरादा व्यक्त करून निघालीं.

' शरयू ' थोडें लाब गेल्यावर कल्याण बोलला, ' माझीच दृष्टि दूषित होती; तुझ्या बाबाविरुद्ध उगाचच मीं काहूर केल.'

' बाबाची व आईची प्रगटपणे माफी मागा म्हणजे झाल. अशान तीं किती धन्य होतील ! '

इतक्यात शरयूला म्हातारा माणिकराम दिसला. त्याला पाहताक्षणीं शरयूने धावतच जाऊन त्याला मिठी मारली.

' सोड शरयू ' माणिकरामाचे नेत्र आनदाने ओलसर झाले होते· मुलगी भेटल्याचा त्याला खरा हर्ष होत होता, तरी समीप येणाऱ्या जावया कडे एकवार निरखून तो म्हणाला, ' मला म्हाताऱ्याला अस कडकडून भेटलेल तुझ्या नवऱ्याला आवडायच नाहीं. आम्हा रानवटाच आतिथ्य तुम्हा श्रीमताना कुठल पटायला ? तुमच्या तोडीचीं माणसं तिकडे हुरड्याचा समाचार घेताहेत.'

' नाहीं बाबा, माझ्याशी लहानपणासारखे प्रेमाने तुम्ही बोलत नाहीं, तुसड्या वृत्तीन वागता.'

' ह्याला मीच कारण आहें' कल्याण सद्गदित स्वराने म्हणाला ' माणिक-रामाचा पाणउतारा होईल अस सदोदित मीं वर्तन केल...'

' तो माझ्या नशिबाचाच दोष, तुमचा नाहीं. गेल्या चार वर्षांत मला किफायतीची बाजू नव्हती. माझा तोटाच व्हायचा होता. मनाजोगतं जमिनींत उगवल नाहीं याची क्षिती मीं केली नाहीं. शरयूच्या आईलाही याच तितकस वाटल नाहीं. परतु पोटच्या गोळ्याची दृष्टिभेट देखील न होण्याचा जो योग आला, तो फार दु:ख देणारा होता; शेवटीं मामले-दारांच्या हातापाया पडून मी तुम्हाला आणवल. फिल्मकपनीच्या मालकाचा मजवर लोभ होता. त्याना बायका मडळी घेऊन बोलावलं; तुमच्या तोलाची चार माणस गोळा व्हावींत हा माझा उद्देश. शेत माझ असल्याच तुम्हाला

न कळवण्याविषयीं माझ मामलेदारांना विनवून सागण होत. सिनेटोनच्या मालकाना मी गैरहजर राहणार असल्याची आगाऊ सूचना दिली होती. त्यांना जावयासासऱ्याची कुरकूर माझ्याच्यान सागवली नाहीं, कुटुंबातील तटे वेशीवर टागण्याला होता होईतों मन घेत नाहीं. मामलेदार सरळ अंत:करणाचे, त्यात जामाताचे स्नेही, सर्व काही सोईवार जुळेल अशी माझी खातरजमा झालेली होती. त्याचा हातभार घेण्याचा हाच हेतु. तुम्हाला शेत माझच आहे हे ओळखण शक्य नव्हत. शरयूला शेताची पुसट-देखील आठवण नसेल. शेताचा देखावा सिनेमात गेला, ही बातमीही तिला सागायच मी विसरलो. आजच्या प्रसगान सर्व ध्यानीं येत आहे. पाच-गणीला शिकायला असल्यामुळे तिचा—आमचा सबध वर्ष सहा महिन्यानी येई. जिवाभावाची किलबिल करताना वेळ सरे. तिथ अशा किरकोळ बाता बोलायची कुठून स्मृति व्हायला ! शरयूचा मामा हुरडा खायला यावा अस फार फार वाटत होत माझ्या विनतीला मान देऊन, सवड काढून तो आलाही असता, पण तो एक शाळामास्तर ! तुम्हासारख्यात कसा शोभून दिसेल ! शिवाय त्याची—तुमची तोंडओळख होती, तो आला असता, तर माझा डाव तुम्हीं हुडकून सासऱ्याला जावयान कावेबाज ठरवल असत. माग आम्हीं पाठवलेले दिवाळीसणाचे जिन्नस परत आले, आम्हा आईबापाचा विचार होता, कीं जावयाना सक्रातीच तिळवण कराव. प्रत्येक वर्षी मी त्या आशेन जमीनींत तीळ पिकवीत होतों. तुम्हाला येण्याबद्दल कळकळीची पत्र रवाना करीत होतों, पण त्याच उत्तर नाहीं. यंदाही तिळवणाचा विचार आहे...'

' माणिकराम, खटपटीनें रजेची मजुरी घेऊन तुमचा सण मी साजरा करीन. कृपा करून मागच सर्व विसरा. मामलेदारानीं एकीकडे नेऊन माझ्या डोळ्यात अगोदरच झणझणीत अजन घातल आहे. श्रीमती, छानछोकी याविषयींचा माझा प्रथमचा दृष्टिकोन चुकीचा ठरला आहे. ज्या दृश्याना आम्ही प्रत्यक्षात शिव्याची लाखोली वाहतों, तींच दृश्य जर बोलपटात पाहायला मिळालीं, किंवा कादबऱ्यातून वाचायला मिळालीं, तर आम्हीं हर्षोत्फुल्ल होतों. रसिकतेचा अभाव हेंच याच खर कारण होय. '

माणिकराम म्हणाला, ' गावात जे थोडे बोट दाखवण्याजोगे लोक

आहेत, त्यात माझी गणना होत असल्याच तुमच्या निदर्शनाला येईल. इतकच कीं, तुमच्या-आमच्या जिंदगींत वेगळेपणा आहे. टोलेजग हवेल्या, मोटरी, पैशानी व दागिन्यानीं भरलेल्या तिजोऱ्या ह्याना तुम्ही धनिकपणाच प्रतीक मानता. आम्ही, जमीनजुमला, विहिरी, गुराचा बारदाना, हीं हिशेबात धरू. परीटघडीच्या कपडयाची किमत आम्हाला नाहीं. सदाच मातींत वावराव लागत, आमचे धुवट कपडे सुद्धा तुमच्या डोळ्याला मळकट दिसायचे. मला वाटत नुसत्या कातडीच्या रगापेक्षा अत:करणाची पारख शतपटीन उत्तम.'

'हा सगळा मोलाचा उपदेश समजून घेण्याची पात्रता आज माझ्या अगीं येत आहे, माणिकराम, तुम्ही मला वडिलासमानच आहात...'

'बस्स झाल ह' शरयू कल्याणास अडवून म्हणाली, 'बाबा, मी आले आहें किवा नाही याबद्दल आई घरीं मनोराज्ये करीत असेल, नाहीं ? मला घेऊन चला तिच्याकडे ..... !'

याच वेळीं मामलेदाराचा आवाज ऐकू आला, 'माणिकराम, आम्हाला हुरडा खायला आमत्रण दिलत अन् तिकडे पाहुण्याशी गप्पा छाटीत बसलां होय ! सुरेख आहे सत्काराची पद्धत...... !'

दूरवर उभे असलेले मामलेदार बोलत होते.

"चला जावईबुवा, पाय उचल शरयू, देवान भल केल. आजची हुरडयाची मेजवानी थाटामाटाची होणार," माणिकराम गडबडीने पावले टाकता टाकता उद्गारला.

# उल्हासनें लग्न कां केलें नाहीं ? : १७

‘ उल्हास, तू अजून लग्न का केलें नाहींस ? तुझ्या बरोबरीच्या मित्रानीं संसार थाटून आज पांच सहा वर्षें झालीं. मी आलों तेव्हां मला वाटलें वहिनी पहावयास मिळतील म्हणून, पहातों तो तू आपला तसाच ! ’

उल्हासचें बी. एजी. पर्यंत शिक्षण झालें होतें. घरची शेती खूप असल्यामुळें तीच तो करीत असे. आज पुष्कळ वर्षांनीं त्याचा कॉलेजातील मित्र त्याजकडे आला होता. व आल्याबरोबर जरा वेळ झाला न झाला तोंच त्यानें उल्हासच्या लग्नाची चौकशी करून त्याला वरील प्रश्न विचारला.

पण एखाद्या घड्याळाला किल्ली दिली कीं तें जसें चालत राहतें, तसें झालें. त्या सबंध दिवसभर त्याच्या डोक्यात तोंच विचार चालू होता. त्यानें आपल्या मित्राला, आपलें शेत, विहिरी, आपण केलेला पानमळा, द्राक्षाचा मळा व उसाचें वावर सर्व दाखविलें; त्यानें त्याच्याबरोबर गप्पाही मारल्या, पण याच्या चेहऱ्यावरील उदासवाणी छटा लपूं शकली नाहीं.

एकदां त्याच्या मित्रानें त्याला विचारलेंसुद्धां ' असा उदास कां दिसतोस ! ' म्हणून. पण त्यानें काहीं तरी सागून वेळ मारून नेली होती.

दिवस मावळला !

पण उल्हासच्या डोक्यांतील दिवसाचे विचार ताजेतवानेच राहिले !

तो बिछान्यावर पडला, पण काही केल्या त्यास झोंप येईना. त्यानें मित्राकडे पाहिलें, त्याला केव्हाच झोंप लागली होती.

तो बाहेर चांदण्यात जाऊन बसला व शून्य दृष्टीनें आकाशाकडे पाहूं लागला.

त्याच्या मनामध्ये सारखे विचार चालले होते—

'त्याचे शिक्षण होऊन तो गावीं आला त्यावेळीं त्याचे वडील होते. त्याना काम होईना म्हणून त्यानीं सर्व जबाबदारी मुलाचे गळ्यात टाकली होती.

आल्यानतर सहा महिन्यानीं......

एके दिवशीं त्याचे शेतातील तरुण मुलगी हौसा घाईघाईनें आली.

' मालक आहेत का ? ' तिनें विचारलें.

' का ग काय झालें ? ' उल्हासनें बाहेर येऊन विचारले.

' मालक लौकर चला, एक रानडुकर शिरले आहे उसाच्या मळ्यात '

' मग शेतावर कुणीच नाहीं का ? '

' आज बाजारचा दिवस आहे ना ? मी आणि दादाशिवाय कोणी नाहीं. दादा तर अथरुणाला खिळूनच आहेत. '

' बरें, आलों ह ! थाब. '

उल्हासनें घरातला भाला घेतला व तो हौसेबरोबर निघाला. उल्हासला शिकारीचा प्रसग असा हा पहिलाच. पण तो विलक्षण धाडशी असल्यामुळें त्यास कांहीं वाटलें नाहीं.

तो रानडुकराचे अगावर चालून गेला. त्याच्या कपाळावर त्यानें जोरानें भाला मारला.

त्या रानडुकरानें जोरानें मुसंडी मारली तेव्हां उल्हासनें फिरून भाला मारला. त्यात भाल्याचा फाळ तुटला.

आता नुसती रानडुकराचीं मुसडी चुकवायची एवढीच गोष्ट शिल्लक होती व ती त्यानें केली. तरी पण त्याचा ओझरता धक्का उल्हासला लागताच शेजारील झाडावर त्याचे सर्वांग जोराने आदळले. तो बेशुद्ध होऊन पडला.

रानडुक्कर चिडले म्हणजे मोठे कठीण. मारीन किंवा मरेन असा त्वेष असतो त्याचे अंगात.

आणि आताहि उल्हास पडला होता तेथे रानडुकरानें चाल केली. तोच मागून भाल्याची जोराची फेक आली.

अगोदरच दोन फेकींनी टेकीस आलेल्या त्या रानडुकरानें ची चीं करीत तडफडत प्राण सोडला.

हौसेने घाईघाईनें पाणी आणले व उल्हासचे डोके मांडीवर घेऊन त्याचे डोक्यावर थापले.

उल्हासने डोळे उघडले—'कोण ? हौसा !—'

'हो मीच ! बरें वाटते का आता ?' तिने त्याचे डोके जमिनीवर ठेवीत विचारलें

'हौसे, मला कसें भ्रमल्यासारखे होत आहे.'

'माझ्या झोपडींत येता का ? इथे ऊन्हही येऊ लागले आहे...'

'चल'

मग हौसेनें त्याचा हात धरून हळूहळू चालवीत त्यास झोपडींत नेले.

दोन तास तो तिथेंच होता.

जरा बरे वाटल्यावर त्याने आजूबाजूला नजर फिरवली.

त्या झोंपडीत स्वच्छता व टापटीप पाहून त्याला अचबा वाटला. तो मनाशींच म्हणाला, 'ब्राह्मणाचे घरातसुद्धा इतकी निर्मळता नसेल !.'

शेजारींच हौसेचा म्हातारा बाप कण्हत पडला होता. तो उल्हासला म्हणाला, 'आता बरे वाटतें ना ? तुम्ही कशाला गरीबाच्या झोंपडींत याल. कळू लागल्यापासून तुम्ही शिक्षणालाच बाहेर गेलात. आज दोन वर्षे झाली. मी अथरुणाला खिळून आहे. तुमच्या वडिलाचीच चाकरी करीत होतों. उद्योग होईना तेव्हां त्यानीं ही येथें पडळ बांधावयास जागा दिली व म्हटलें 'कान्होबा आता इथेंच रहा पोरीला घेऊन. तुझी पोर उद्योग

करील येथेच. तेव्हापासून माझी हौशी माझे करते आहे. किती गुणी आहे पोर माझी. इग्रजी तीन बुके शिकली आहे. इच्छा आहे ना ! म्हटले लग्न करावे, पण मलाच बरे वाटत नाहीं...'

म्हाताऱ्या कान्होबाने आणखीहि लाबण लावली असती पण हौसाच म्हणाली, '–दादा, पडून रहा आता. तुम्हाला बोलायला हवें आहे पुष्कळ, परतु मालकाच्या डोक्याला त्रास होईल ना ! '

नतर उल्हासला हौसेनें रानडुकराच्या शिकारीची हकीगत सागितली. तिनेच मारले होते रानडुकराला.

उल्हासला वाटले तेथून हलूच नये. पण जाणें आवश्यक होतें. आज बाजाराचा दिवस होता

त्यानें हौसाने दिलेले दूध घेतले. त्याला अमळ हुषारी वाटली. नतर तो हळू हळू घरी निघाला.

जाताना हौसेने त्याला विचारले होतें ' मी येऊ का बरोबर ? '

तो म्हणाला होता ' काहीं नको ! तुझ्या दादाला काय हवे नको ते तूं पहा '

झोपडीपासून जरा दूर गेल्यावर त्याने मागे वळून पाहिले. हौसा त्याच्याकडे बघत दारात उभी होती.

उल्हास त्यावेळी स्वत:शींच आश्चर्य करीत होता ' किती गोड व गुणी पोर ! आपल्या नजरेखालीं आज सहा महिने काम करीत आहे, पण आपल्या लक्षात कसे हिचे गुण आले नाहींत ! ! '

तेव्हापासून बहुधा दर आठवड्याने बाजारच्या दिवशीं सकाळीं तो हौसेच्या झोपडीवर जात असे. साऱ्या आठवड्यात त्याला काय तो तेवढाच वेळ होता.

*  *  *  *

सुमारे एक वर्ष लोटले. हौसा उल्हासला आता मालक म्हणून न सबोधता ' उल्हास ' म्हणत असे. येथपर्यंत त्याचीं ओळख झाली होती.

अलीकडे एक आठवडाभर उल्हासाचे वडील त्याचें लग्न ठरविण्याचें गडबडींत आहेत अशी गुणगुण जिकडे तिकडे पसरली होती.

एक दिवस नेहमींप्रमाणें तो हौसेच्या झोंपडींत गेल्याबरोबर त्यास कान्होबा म्हणाला ' काय मालक लग्न करतां आहे का ? हौसा म्हणत होती, परवां तुमचे वडील तुमच्या भावी सासऱ्याना मळा बिळा दाखवून गेले म्हणून. मीहि आता पोरीला उजवीन म्हणतो. आता मी असाच खितपत पडायचा. आज तीन वर्षे झाली, चिकटलोच नाहीं का अथरुणाला ? म्हटलें आपल्यासाठीं पोरीच्या लग्नाचें कशाला उगाच लांबणीवर टाकावें...'

म्हातारा अजूनहि खूप बोलला असता. पण उल्हासचें तिकडे लक्षच नव्हतें. त्याचे डोळें हौसेला शोधीत होतें. ती नाहीं हें पाहून त्याला वाटलें, असेल जवळपास कुठे तरी, येईल एवढयात. सरते शेवटीं तो उठलाच वें त्यानें कान्होबाला विचारलें—' हौसा कुठे आहे ? '

' आत्ता होती कीं इथें ! '

उल्हासनें रानात तिला बरेच शोधले. द्राक्षाच्या मळयात काम करीत होती ती !

'–हौसे, हें काय ? इकडे का आलीस ? '

' म्हटलें वेल बांधायचे राहिले आहेत द्राक्षाचे, तें काम करावे. '

' राहु दे तें–चल जरा फिरू ? ' तिचा हात धरून तिला उठवीत उल्हास म्हणाला.

तिनें झटकन् आपला हात सोडवला व पुन्हा द्राक्षाचा वेल हातात घेऊन म्हटलें ' आणि खरेंच, एक सागायचें विसरलें. रानडुकरे पुन्हा येऊ लागली हं. काल शेजारच्या धनाजींच्या मळयात आली होतीं.—'

' येऊ देत. मी आज रात्रीपासून गडयाना राखण ठेवतों. पण चल ना तू. ' असें म्हणत त्यानें तिला जवळ ओढलीच.

तिच्या हातातील वेल तुटून पडली.

' हें काय ? वेल तुटली ना ? तुमचे बाबा रागावतील कीं आता ? '

' रागावूं देत ' त्यानें तिला अधिकच जवळ ओढीत म्हटलें.

' उल्हास, सोडा मला. असें काय तें ? जाऊ द्या ना ? '

हौसेनें उल्हासच्या गालाला ओरखडा घेऊन स्वतःची सुटका करून घेतली व पळाली ती तेथून.

जातांना ती मागें वळून म्हणाली ' उल्हास, रागावू नका हं, थोडें काम आहे आज मला ! '

उल्हास शून्य अंतःकरणानें घरीं गेला. त्या सबंध दिवसभर तो भ्रमिष्टाप्रमाणें वागत होता.

त्याच दिवशीं रात्रीं बाबानीं त्यास सांगितलें ' उल्हास, तुझें लग्न ठरवलें आहे. त्या रायकराचीं मुलगी. त्याना परवाच शेत, मळे वगैरे दाखविले होते. अठराशें हुंडा ठरला आहे. आणखी पंधरा दिवसानीं मुहूर्त आहे. उद्यां साखरपुडा करायला जायचें. '

' काय ? ' उल्हास खुळ्यासारखा म्हणाला. त्याच्या डोक्यांत एक शब्दही शिरला नव्हता.

' म्हटलें आज दिवसभर तो असेंच करतो आहे. त्याला बरें नाहीं वाटतें आज. उद्या सांगितलें तर नाहीं का चालणार ? तो आपल्या बाहेर नाहीं ' उल्हासची आई म्हणाली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शेतावरील राखण ठेवलेल्या गड्यांपैकीं एकजण घाईघाईने येऊन म्हणाला 'मालक चला, हौसेला रानडुकरानें मारलें.'

' काय ? ' असें म्हणून उल्हास धावतच शेताकडे गेला.

पण जाऊन कोणता फायदा होता ? रानडुकरानें हौसेचा केव्हांच बळी घेतला होता.

मागाहून त्या रानडुकराला शेतावरील गड्यानीं मारलें; पण त्याचा काय उपयोग ? धनुष्यांतून बाण निघून गेला होता !

तो गड्यांना खूप बोलला. त्याच्यापैकीं एकजण म्हणाला " आम्हाला दादच नाहीं, हिनेंच तुमच्या नावानें आरोळी मारली तेव्हा आम्ही आलों. रानडुकरानें प्राण केव्हांच घेतला होता. मग त्याला आम्ही मारायला धावलों व ह्याला तुमच्याकडे पाठवला."

इतक्यांत म्हातारा कान्होबा रडत रडत काठी टेंकीत आला.

उल्हासनें हौसेचें डोकें मांडीवर घेतलें व...' उल्हासच्या डोळ्यांतून टपकन अश्रु आले. त्याच्यानें पुढें विचार करवेना. तो चादण्यांतून उठला व आथरुणावर जाऊन पडला.

# पडकें घर : : : १८

काहेर ऊन मी म्हणत होते. ऐन दुपारची वेळ. मला काहीं सुचेना. सुटींत गावाला आल्यापासून सारखे पुस्तक हातात असल्यामुळे वाचनाचाहि आता कटाळा आला होता. वेळ कसा घालवावा या विवनेंतच मी होतो. तोंच शेजारी शकरनानाच्याकडे मोठमोठ्यानें चाललेल्या सभाषणाचे आवाज ऐकू येऊ लागले, तेव्हा त्याच्याकडे गेलो.

शंकरनानाच्या घरीं घारुअण्णा पान खायला आलेले होते. मी गेल्यावर शकरनानानी मला सुपारी कातरून दिली व विचारले, " का ? एरवींच झुकलात वाटत इकडें ? "

" हो घरीं करमेना, तेव्हा म्हटल जावं शकरनानाच्याकडेच ! " मी उत्तरलों.

" अहो शकरनाना !' घारुअण्णा विडा तोंडांत घालीत म्हणाले, ' मघाशीं काय हकीगत सांगणार होता ती तशीच राहिली कीं ? '

' ह ह ! तें कोपऱ्यावरच पडकें घर आहे त्याबद्दल होय ? '

‘ तुम्हींच म्हणालात ना, तुमच्या गावकऱ्यानीं त्यात भुताटकी आहे म्हणून तें ओसाड केलें ? ’ घारुअण्णानीं विचारलें. ते आमच्या गावा-शेजारी लोकलबोर्डाच्या रस्त्यांचें काम सुरू झाल्यामुळे, देखरेख करण्यासाठीं त्याचे खात्यातर्फे आले होतें. कामगिरी गावाबाहेरची असली तरी घारु-अण्णा मुक्कामाला आमच्या नजीकच होते.

‘ सगळ सागतो ह, ऐका ’ असें म्हणून शकरनानानीं तबाखूची एक फक्की मारली.

‘ चांगले तीस एक वर्षापूर्वी हल्लीं पडीत असलेल्या त्या घरात झुऱ्याबा रहात होता. माझ्या आठवणींतली गोष्ट. त्याचच ते घर ! त्याला आसपास शेतीवाडी काहींही नव्हती. आपल्याला जी पुढची ढासळलेली भित दिसत आहे त्या जागी पूर्वी दुकानाच्या सोयीची जागा असून झुऱ्याबा वाणस-वद्याचा व्यापार करीत असे तिथ.

माझ्या आठवणीप्रमाणें झुऱ्याबाला सुभान शिवाय कोणीहि नव्हते. सुभान हा त्याचा एकुलता एक मुलगा. शाळेंत तो चागला हुषार होता. सुभान आणि मी बरोबरचेच ! आम्ही दोघे एकाच दर्गात होतो ! माझी व त्याची विशेष गट्टी कधींच नव्हती. आम्ही ब्राह्मणाची मुल एका गटानीं वर्गात बसत असू. सुभानचें दोस्त दुसरे होते.

आपलें काम आणि आपण हाच त्याचा खाक्या बहुतेककरुन असे. झुऱ्याबाचे त्याला वळण उत्तमपैकीं होतें. एकच एक पोर म्हणून सुभानचे केव्हाही नसते लाड झाले नाहींत.

शाळेत जावे व सध्याकाळखेरीज इतर वेळीं दुकानावर बसावे त्यानें. अभ्यासदेखील तेथेच करावा. सायकाळी, मारुतीच्या देवळाजवळ मरा ठ्याची तालीम आहेना, तेथें तो जात असे.

कुस्त्या मारण्यात आमच्या गावीं सुभान्यानें नाव कमावलें होतें. आम्हा बरोबरीच्या सर्व सवगड्यास सुभान्या भारी होता. गावच्या आसपास यात्रेच्या वेळेला ज्या कुस्त्या करितात, त्याना सुभान्या गेला कीं एकदोन पागोटी तरी नक्की आणायाचाच.

एकदा असाच शेजारच्या मैनापूर खेड्यासमीप असलेल्या जत्रेला तो

गेला होता. परंतु इनाम न घेतां तसाच परत आला. तो दुकानावर बसला असतां मी आपली सहज चौकशी केली ' काय सुभान, किती पागोटी बक्षिसाला आलीं ? '

तो म्हणाला, ' मी यात्रेलाच गेलो नाहीं. '

' का ? ' मीं विचारलें.

सुभान बोलला, ' यात्रेस जाताना वाटेत, तो मैनापुरच्या पाटलाचा पोरगा भुजग नाहीं का, तो एका मुलीशी लघळपणा करीत होता. त्याचा समाचार घेतला.'

' कुठ आढळला तो तुला ? '

' त्याच्याच शेतात. ' सुभान म्हणाला. ' तिला शेताकडच्या वाटेनें यात्रेला जाऊ म्हणून नेली आणि लागला पाजीपणा करायला, मी त्या मुलीचा शब्द कानी आल्यासरशी त्याच्या पडाळींत शिरलों आणि हाणला चागला. अखेरी धूम ठोकली बेट्यान ! पण यामुळ पाटलाच्या मनात त्यान काहीं तरी भरवून दिल असाव ! कारण मला भुजगाचा बाप कुस्त्यात भाग घेऊ देईना ! '

मला आणखी सुभानच्याच तोंडून असे कळलें कीं, ज्या मुलीला त्यानें भुजग्याच्या हातून सोडवली तिचें नाव प्रयागा. ती मैनापुरच्या एका गरीब कुणब्याची मुलगी होती.

तेव्हापासून प्रयागेचा बाप व झुन्याबा याच्या वारंवार भेटी होऊ लागल्या. सहजच परिचय वाढला. पुढे प्रयागेच्या बापानें सुभानला प्रयागा देण्याबद्दल भाषा काढली.

प्रयागा नाकाडोळयानें चारजणींत उठून दिसेल अशी पोर होती. तिला भुजगाकरिता मैनापूरच्या पाटलानेंहि मागणी घातली होती. तेव्हा झुन्याबाचें म्हणणें असें पडलें कीं प्रयागा भजगाला द्यावी. परतु प्रयागेचा बाप काहीं केल्या हेका सोडीना. झुन्याबाला पाटलाचा व त्याच्या पोराचा खुनशी स्वभाव माहीत होता व आपण आतां म्हातारे झालों, उगीच बाशिग बांधून मुलाशीं पाटलाचे वैर कशाला जोडा, असा विचार मनात आल्यामुळें त्यास प्रयागेला सून करून घ्यावी किंवा नाहीं हा प्रश्नच पडला.

सुभान अन् प्रयागा यांचेंहि कधीं कधीं भेटीचे योग येत. तेवढ्या अवधींत उभयताना एकमेकाची ओढ लागली होती.

दोघांच्याहि हृदयांत परस्पराविषयीं आपलेपणा उत्पन्न झाला होता.

झुऱ्याबानें सुभानचा कल बघितला. त्याला प्रयागा पसंत आहे असें कळल्यावर म्हाताऱ्यानें प्रयागेच्या बापाला लग्नाबद्दल संमति दिली.

सुभानचा विवाह मोठ्या थाटानें झाला. सुभान व प्रयागा दोघेंहि सुखानें रहात होती. झुऱ्याबाच्या शब्दाबाहेर तीं कधींच नसत. म्हातारा फार धोरणी होता. त्याला ठाऊक होतें कीं भुजग्याच्या मनांत आपल्याला प्रयागा मिळाली नाहीं हें डाचत असले पाहिजे. त्यानें सुभान व प्रयागा यांचा मैनापुराशीं संबंधच येऊ दिला नाहीं.

प्रयागाचें लग्न झाल्यावर दोन वर्षांतच भुजंगाचा बाप वारला व भुजग्या मैनापुरचा पाटील झाला.

प्रयागा मधूनमधून माहेरला जात असे पण अलीकडे तिचें माहेर सुटले होतें. तिच्या बापाचे भुजग पाटलाशीं वाकडे येऊन कोर्टापायीं त्याचे शेत पार गमावले व तो मुंबईला कामधंदा करायला गेला होता.

झुऱ्याबानें डोळे सुखात मिटले. त्याला मरताना प्रयागासारखी बायको स्वतःच्या मुलाला मिळाल्याबद्दल धन्यता वाटली. दुकानाचें काम असल्या-मुळे सुभानही त्याच्या नजरेसमोरच असे. सुभान व प्रयागा याचे एक-मेकावरील प्रेम पाहून त्याला आपण कृतकृत्य झालों असें वाटे. शिवाय म्हाताऱ्याच्या हयातींत सुभानला मुलगाही झाला होता.

झुऱ्याबा वारल्यावर तीन चार वर्षांची गोष्ट.

एकदा सुभान दुकानचा माल आणण्यासाठीं शहरगावीं गेला असता भुजग्या पाटील त्याचे घरात शिरला. त्यानें प्रयागेला सुभान्यास सोडण्या-विषयीं सांगितलें व आपली विषारी दृष्टि तिच्या चेहऱ्याकडे रोखली. पण तितक्यांत दुकानावर गिऱ्हाईक आले. तेव्हा प्रयागानें भुजग पाटलाची गिऱ्हाइकासमक्ष खूप कानउघडणी केली. भुजग पाटील गुरगुरत निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं सुभानला प्रयागाकडून हे वृत्त समजल्यावर त्याच्या

अगाचा भडका उडाला. तडक जाऊन त्यानें भुजग पाटलाची हजिरी घेतली.

भुजग पाटलानें दोनहि बाबी मनात ठेवल्या.

पुढे नागपचमीचा मुहूर्त आला. नेहमींप्रमाणें नागास नैवेद्य मागण्यासाठीं दोघे गारुडी सुभानाच्या दुकानावर गेले.

सुभानचा धाकटा बबन चार वर्षांचा होता. त्यालाहि नाग पहाण्याची उत्सुकता होतीच. प्रयागा बबनचा हात धरून बाहेरच उभी होती. सुभाननें दोघाना टोपलीतील नाग दाखविण्यास सागितले.

दोघानीहि आपल्या टोपल्याचीं झाकणे काढली. सुभानच्या लक्षात आले कीं ते नाग नव्हते, साप होते.

झाकणें उघडल्यावर काही तरी कारणावरून ते गारुडी आपसात भाडू लागले.

इकडे सुभान व प्रयागा ओरडत होते, बाहेर पडलेले साप आत घे म्हणून.

पण टोपल्या अशाच ठिकाणीं उघडल्या गेल्या होत्या कीं तेथे सर्पाना व्यवस्थित आत जाण्यास दुकानात असलेल्या धान्याच्या पोत्यामधील फटींतून वाट होती.

गारुडी ऐकत नाहींत व साप पोत्यांमागे जात आहेत हे पाहून सुभान ते दशधारी प्राणी ठेचण्यास धावला. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. साप नाहीसे झाल्यानतर गारुड्याचीं भाडणे थाबली व ते ‘ आमचे नाग विनाकारण वादात हरवले, आमचे नैवेद्य बुडाले ’ असे कुरकुरत निघून गेले.

सुभानचे इतर भानगडीकडे लक्षच नव्हते त्याने त्या दिवशीं सबध दुकान उलथेपालथे केले पण साप गवसले नाहींत.

घरची जागा. शिवाय ज्यावर पोटाला निर्वाह मिळे ते दुकान त्या जागेवर चांगलें चालत होतें. तेव्हा घर सोडणें अशक्यप्राय ठरले.

वर्ष निघून गेल्यावर वरील प्रसग स्मरणातून जवळ चवळ गेलाच; सापानीं स्थलातर केलें असावें असें सर्वांस वाटलें. पण...... ...

एक दिवस सध्याकाळचा बबन दुकानात खेळत असता त्यास सर्पदश झाला. पोरानें तडफडून प्राण दिला.

सुभान व प्रयागा याच्या दुःखाला पारावार नव्हता. बबन म्हणजे त्यांच्या जिवाचा कलिजा होता. दोनतीन महिनें दोघांच्या डोळ्याला पाणी आले नाहीं असा एकही दिवस गेला नाहीं.

प्रयागाचे सुख देवानें इष्टाळलें हेंच खरें. नाही तर बबनच्या मागोमाग थोडक्याच अवसरानें सुभान साप चावून मेला, असे झालेच नसतें.

प्रयागा शोकानें वेडी होण्याची अवस्था आली. गावात अफवा पसरली कीं सुभानच्या घराला भूत लागलें. प्रयागेला घर दावेदार वाटू लागले. तिने सर्व दुकानचे सामान कवडीच्या मोलाने विकले व ती घर टाकून निघाली.

सारे जग आता प्रयागेला ओसाड भासत होतें. सुभानच्या नांवाचा जप करीत ती गावाबाहेर पडली.

रस्त्यात तिला भुजग पाटील भेटला.

तो तिला म्हणाला, 'प्रयागा, कोणतीं दिशा धरणार तू ? तुझा मुबईस गेलेला बापही दारू नि तार्डीत बुडून बऱ्याच दिवसापूर्वी गमावला. त्या शिवाय तुला कोणींच नव्हते. माझ्या घरीं चलतेस ....... '

बोलत असतां भुजग्यानें तिचा हात धरला.

प्रयागाने त्याचा हात झिडकारला व ती पावले उचलू लागली.

भुजग पाटलाचा सताप अनावर झाला. तो ओरडून म्हणाला, "इतकी मस्ती आहे का ? ऐक तर नीट ! तुझ्या घरात नागपचमीची सधी साधून सर्प घालण्याचे व तुमच्या ससारात विष कालवण्याचे माझेच कारस्थान ! आलें ध्यानात, तुझ्या दादल्याबरोबर तूहि निजधाम गाठल असतस तरी ठीक होत... "

" काय भुजग्या, माझ्या सुभानला तू मारलस ? " प्रयागेला कोठून बळ आले कोण जाणें ! तिनें एक भला मोठा दगड उचलला व भुजग पाटलाचे अगावर भिरकावला आणि फिरून एक दगड घेऊन भुजगाकडे चवताळून ती धावली.

भुजग पाटलाला पहिल्या दगडानें जबर मार बसला. त्याच्या खांद्याला मोठी दुखापत झाली. जखमेच्या ठिकाणाहून रक्त देखील ओघळूं लागले.

तो ठणाणत पोलिसचौकीकडे पळाला व प्रयागा त्याचे मागें दौडत गेली.

प्रयागेला गिरफदार करण्यांत आले. फौजदारी खटला होऊन तिला दोन वर्षे सक्तमजुरी भोगणें आलें.

सजा पुकारली गेल्याची बातमी ऐकून भुजगा पाटलाला बरे वाटलें. तो त्यासमयीं अथरुणासच चिकटला होता.

कैदेची मुदत सरल्यावर प्रयागा तुरुंगाबाहेर पडली. तिला प्रथम कोण दिसले असेल तर भुजगा पाटील ! तो प्रयागेस मैनापुराकडे बोलावीत होता.

प्रयागेनें त्याच्याकडे ढुंकूनहि पाहिले नाहीं.

ती थेट गावात आली. रात्रीपर्यंत स्वत:च्या घरांतच प्रयागा होती.

‘ सुभामजी, मला या विषारी जगाचा कटाळा आला आहे. तुमच्या खेरीज इथ मला खर प्रेम कोणीच लाभू दिलं नाही. तुम्ही होता तोपर्यंत हें जग मला स्वर्गासमान होतं. पण यापुढ ...... माझ्याकडे अपराधी म्हणून बोट करतील, अपराध्याला काम कोण देणार ? थारा कोण देणार ? आणि कोणी दिलाच तर त्याची भरपाई...भरपाई...माझी अब्रू... ! ’

काळोख दाटेपर्यंत ती असेच बडबडत होती.

सुभान मेल्यापासून ते घर भुताटकीचें ठरलें होतें म्हणूनच एकहिजण तिचें शांतवन करावयास गेला नाहीं. कोणी म्हणत कीं प्रयागेला भूतानें पछाडलें.

रात्रीं त्या घराच्या विहिरींत मोठा आवाज झाला. त्याबरोबरच ‘सुभान’ अशी कर्कश हाक ऐकू आली. भुताखेताचें घर म्हणून शेजारीं पाजारीं, सर्व लक्षात आले असूनहि निश्चल राहिले.

पोलीस पचनामा झाला. प्रयागास वेड लागून त्या भरांत तिनें आत्म-हत्या केली असा पोलिस रिपोर्ट होता.

मैनापूरचा भुजंग पाटील अजून जिवत आहे. त्याची सावकारी सुरेख चालली असून त्यानें दोन लग्नें केलीं आहेत. दोन्हीहि बायका हयात आहेत.

आमच्या गावांत मलाच एकट्याला घडलेल्या हकीगतीची तपशीलवार माहिती आहे. काहीं गांवकऱ्याना मी या पडक्या घराचा वृत्तात सागून

पाहिला. माझ्यावर त्याचा विश्वास बसत नाहीं. ते म्हणतात, ' भुजगा पाटील केवढा धार्मिक, परवांच दोन हजार रुपये खर्चून त्यान मैनापुरांत देऊळ बाधल, आणि तो असे करील ? छे:, शक्य नाहीं. सुभानचे घरच पिशाच्चानी घेरल होत. भुजगा पाटील स्वत:हि असेंच म्हणतो ! '

' काय जगाचा न्याय आहे पहा, शकरनाना ! ' घारु अण्णा म्हणाले, ' चोर चैन करतात आणि सन्याशी सुळीं जातात. कलियुगाचा महिमा आहे हा ! '

मी बाहेर पाहिले. ऊन कमी झाले होतें.

विचाराच्या तद्रीतच मीं शकरनानाची बैठकीची खोली सोडली व आमच्या दरवाजात पाऊल टाकले. पण तसे करण्याच्या आधीं एकदा त्या कोपऱ्यावरील पडक्या घराकडे दृष्टिक्षेप टाकण्यास मी विसरलों नाहीं.

# लांछन : : : ११

खंडू भेळविक्या होता.

अगदी लहानपणापासून, त्याची आठवण धड होती त्या वयापासून, त्याने मायेच्या माणसाचे प्रेमाचे शब्द कधीं ऐकले नव्हते. त्याच्या भूकतहानेविषयीं कोणी आस्थेवाईकपणे चौकशी केलेली त्याला आठवतच नव्हती. पाच वर्षांपासून एका हॉटेलात तो नोकरी करीत होता. दिवसभर हॉटेलची बारीकसारीक कामे तो पार पाडी, आणखी रात्रीं त्याच हॉटेला-तर्फे एका सिनेमा थिएटरात सोडा, लेमन, वगैरे माल खपवी. त्याचा आवाज खणखणीत होता. अंगात चपळाई विलक्षण होती व म्हणूनच त्याला हॉटेमध्ये जेवून खाऊन महिन्याकाठीं एक रुपया मिळत असे.

खंडूने दहा वर्षे अशी नोकरी केली. त्याचा कधीं खाडा नव्हता, कामांत कुचराई नव्हती. मालकाला खंडूपासून केव्हाही नुकसान पोंचले नाहीं म्हणून मालक इतर नोकराप्रमाणे त्याला टाकून बोलतही नसे.

कदाचित् खंडू जन्मभरही त्या हॉटेलमध्यें राबला असता. पण एक प्रसंग अचानक उद्भवला व त्यामुळें खंडूची नोकरी सुटली.

एक दिवस हॉटेल—समोरच्याच इमारतींतून सहा कप चहा व सहा पावाची मागणी आली. मालकाने खड्डूला ते सामान नेण्यास सांगितले. खड्डूने गरम चहाने भरलेली किटली हातात घेतली. सहा कप व सहा पाव ताटात ठेवले आणि पलीकडच्या इमारतींत जाण्यासाठीं तो निघाला.

पण मध्यतरी रस्त्यातील एका कुत्र्याने ताटातील पावावर उडी घेतली. खड्डू गडबडला. त्याच्या हातातील किटली व कपबशा रस्त्यावर आदळल्या. कुत्रे पाव घेऊन तर केव्हाच पसार झाले होते.

खड्डूच्या हातात फक्त रिकामे ताट होते. मालकाने हे सर्व बघितले; खड्डूला दुकानात बोलावून त्याची खूप खरड काढली. खड्डूला खरड-पट्टीची सवय नव्हती, त्याने उलट उत्तरे केली. मालक चिडला, त्याने खड्डूच्या अंगावर एक रुपया भिरकावला व त्याला पुन्हा तोंड न दाख-विण्याविषयी बजावले.

खड्डूने रुपया उचलला व तो दुकानाबाहेर पडला.

० ० ०

स्वतंत्रपणे जगात वावरण्याची त्याची ही पहिलीच खेप होती. मुंबईचे रस्तेही त्याला पुरते माहीत नव्हते. खड्डूचे डोके ठिकाणावर नव्हते. पाय नेतील तिकडे तो फिरत होता.

फिरता फिरता तो चौपाटीवर आला; समुद्रावरून गार वारा येत होता; त्याच्या लहरींत बरे वाटेल म्हणून तो वाळवटातच बसला.

कोणाचीही नोकरी करावयाची नाहीं, कोणाचे शरमिंदे रहायचे नाही असा त्याचा ठाम बेत ठरला होता. मग करायचे काय ? तेच विचार त्याच्या मनात घोळत होते.

तो बसल्याला चांगले दोन तास झाले. हळूहळू संध्याकाळ पडू लागली. लोकांचे जमाव गप्पा मारीत चौपाटीकडे येऊ लागले.

खड्डूच्या डोक्यात एक कल्पना आली. तो चटकन उठला व चौपाटी सोडून रस्त्यानें चालू लागला. सुमारे अर्ध्या तासानें डोक्यावर पाटी घेऊन ‘ भेळ घ्यायची का भेळ ’ असें मोठ्यानें ओरडत तो चौपाटीच्या वाळ-वटांत फिरू लागला. त्याच्याजवळ जो एक रुपया होता त्याच्या जिवावर हा नवीन धंदा त्यानें सुरू केला होता.

लौकरच भेळ सरली. खड्डूला पावणे तीन आणे फायदा झाला. पैसे मोजता मोजता खड्डूची आतापर्यंत विचारी असलेली मुद्रा हसरी झाली. ' बस् , आता कोणाची नोकरी करावयाचीच नाहीं, ' तो मनाशीं म्हणू लागला.

पुढें पधरा दिवस खड्डूनें उघडयावर काढले. व नतर पाच रुपये महिन्याची एका चाळींतील लहानशी खोली भाडयानें ठरवून त्यात तो राहू लागला.

* * *

पाच वर्षें खड्डूनें त्याच धद्यात काढली. तो सचोटींत वागला. त्याला फायदाही पडत असे. कुणाची उसनवारी त्यानें अजून केली नव्हती. कुणाच्या पैलाही खड्डू लागत नव्हता.

भेळ करण्यास लागणारे सर्व जिन्नस तो घरींच बनवीत असे. सध्याकाळीं चारच्या सुमारास डोक्यावर टोपली घेऊन तो चौपाटीवर जाई. रोजच्या परिचयामुळे चौपाटीवर नेहमीं येणारे काहीं लोक आता त्याच्या चागलें माहितीचेही झाले होते.

राजारामपत त्यापैकींच एक होत. ते गर्भश्रीमत होते. सहाजिकच मित्राचा घोळका नेहमीं त्याजबरोबर असे. रोज ते चौपाटीवर आले कीं निदान दहा मित्रमंडळी तरी त्याजरोबर असावयाचीच. त्याच्या गप्पा सिनेमा नटी बद्दल, नटाबद्दल किंवा नाटक बोलपट या सारख्याच विषयावर चालत. गप्पागोष्टी रगात आल्या कीं तें खड्डूला हाक मारीत व खड्डूची दहाबारा आण्याची भेळ सहज खपे.

अशा रोजच्या सुरळीत जीवनास पाच वर्षानतर खड पडला.

खड्डू कॉलऱ्यानें आजारी झाला व तें दुखणें त्यास चार महिने पुरलें. धर्मार्थ दवाखान्यांतून जाववेल त्या दिवशीं तो औषध आणीत असे. पण इतर खर्चाची तोंडें कशीं बद करणार ? मिळकत तर पूज्यावर होती. दुखण्यामुळें धदा करणें शक्य नव्हतें. अशा परिस्थितीत कधीं केलें नाहीं ते करणे खड्डूला भाग आलें. वाण्याकडची उधारी चार महिन्यांत तीस रुपये झाली. घरभाडेहि वीस रुपये थकले.

चार महिन्यात थोडे हिंडण्याफिरण्याची ताकद आल्यावर खडू फिरून धंदा करू लागला.

वाण्याच्या रोज त्याच्याकडे खेपा चालू होत्या. चाळीचा भय्या भाडें देण्याबद्दल धमकावीत होता. खडूजवळ त्याना देण्यासारखे काहींच नसल्यामुळें दोघेही आपले पैसे बुडतील या शकेनें अधीर झाले.

या रोजच्या तगाद्यानें खडू अगदीं त्रासून गेला.

* * *

खडू आज भेळ विकण्यास गेला तेव्हां त्याचें डोक्यात आता काय करावे हेंच विचार चालले होते. नेहमीप्रमाणें राजारामपतानीं आजही त्याजकडून भेळ घेतली. त्याच्या गप्पा चालल्या होत्या. राजारामपतानीं एक अधेली त्याचे अगावर भिरकावली व पुन्हा पाकीट खिशात ठेवले.

पण त्यावेळीं खडूचें लक्ष अधेलीकडे नव्हतें. राजारामपत पाकीट काढीत असताना त्याच्या खिशातील एक सोन्याचे चकचकीत घड्याळ वाळूवर पडले होते, त्यानें त्याचे लक्ष वेधून घेतले.

एक क्षणभरच ! लगेच खडू भानावर आला. त्याच्या जवळच पडलेली अधेली त्यानें उचलली व भेळीची पाटी घेऊन तो उठला.

यानतर राजारामपत चौपाटीवरून जाईपर्यंत तो त्याच्या आसपासच घुटमळत होता. त्या घड्याळावर त्याची पाळत होती. राजारामपत व त्याची मित्रमडळीसुद्धा गेली, तेव्हां त्यानें तें घड्याळ उचललें. तसें करताना थोडा वेळ त्याचे मन बावरले. पण लगेच त्याला भाडें नाहीं दिलें तर सामान जप्त करीन अशी भय्याच्या धमकीची आठवण झाली; वाण्याच्या हेलपाट्याचें स्मरण झालें आणि त्यानें झटकन घड्याळ सदऱ्याच्या खिशात घातलें व तो घराकडे निघाला.

* * * *

इकडे राजारामपतांना त्या दिवशीं काहीं घड्याळाची आठवण झाली नाहीं. रात्रीं एक चागला सिनेमा "शो" होता; त्यास त्याना जायचें होतें व त्याकरतां लवकर जेवणखाण उरकणें अवश्य होतें. या गडबडींत त्यांना घड्याळाचे अजिबात विस्मरण झाले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं घड्याळास किल्ली देण्यासाठीं त्यांनीं कोटाचे खिसे चाचपले तेव्हा घड्याळ गेल्याचें त्यास उमगले. व तें त्यानीं आपल्या पत्नीला सांगितलें.

' मग तपास करा कीं,' त्याची पत्नी म्हणाली.

' अग ते माझे नव्हतेच मुळीं. मी तुझी आपली थट्टा केली. मला ते मिळाल्याची हकीकत मोठी गमतीची आहे. सुमारे महिन्यापूर्वी मी चौपा-टींवर एकटा फिरावयास म्हणून गेलों व एका बाकावर बसलों होतो. जरा वेळाने एक गुजराथी म्हातारासा इसम शेजारीच येऊन बसला त्यानें वेळ पहाण्यासाठीं म्हणून खिशातलें घड्याळ काढले. इतक्यात एक वर्तमानपत्र विकणारा पोऱ्या आला. त्याने घड्याळ बाकावर ठेवले, व वर्तमानपत्र विकत घेतले. मी पाहिलें, मुंबईचे धनाढ्य व्यापारी म्हणून पहिल्याच पाना वर त्याचा फोटो असून मुलाखत छापली होती. स्वारीं घाईघाईनें उठून आनंदभरात वर्तमानपत्रातील मजकूर वाचीत मोटारीकडे रवाना झाली. घड्याळ बाकावरच होतें. तें मी घेतले. त्याच्या आत त्या व्यापाऱ्याचे 'झुंबरशेट' म्हणून नावही होते नंतर त्या झुंबरशेटने जो घड्याळ आणून देईल त्यास पंचवीस रुपये रोख बक्षीस देऊं केले असल्याबद्दल वर्तमान-पत्रात जाहिरात दिलीं. चांगली दोन चार दिवस येत होती ती जाहिरात. पण मी पंचवीस रुपयाकरता इतके भारी किंमतीचें व सुबक घड्याळ का सोडीन, शिवाय एवढा सचोटीचा मामला दाखवायला सवड आहे कोणाला ! म्हणून घड्याळ मिळाले, तेव्हा विशेष आनंदहि वाटला नाही. व आता गेले त्याबद्दल हळहळही करीत नाही—' असें म्हणून राजारामपंतानीं पत्नीची काळजी मिटविली.

× × × ×

खड्डूनें पुष्कळ विचार केला. त्याचें एक मन म्हणे, ' प्रामाणिकपणानें राजारामपंताना घड्याळ नेऊन देण्यातच खरा मोठेपणा आहे.' पण लगेच दुसरें मन त्याला सांगे '—राजारामपंताना काय कमी आहे, त्यांच्या खिज-गणतीतही नसेल ही गोष्ट. सध्या तू नडला आहेस, जिथें मानानें पांच वर्षे काढलींस तिथें बेअब्रू होण्याची तुला पाळी आली आहे. देवानें सोन्या-चा घास दिला आहे का सोडतोस ? '

खड्डूनें घड्याळ उलटेंसुलटे करून पाहिलें. त्यास अक्षरओळख नव्हतीच. त्यानें त्याची एक तबकडी अदाजानें काढली, कांहीं अक्षरें लिहिलेलीं त्यास आढळली. पण ती वाचता येईनात. पुन्हा त्यानें घाईघाईनें तबकडीं लावली. त्याला वाटले याच्याशी जास्त खटपट केली तर हें बिघडेल म्हणून पुन्हा त्यानें ते सदऱ्याच्या खिशात घातले त्याचा काहीं तरी विचार झाल्यासारखा दिसला. त्याने डोक्यावर टोपी ठेवली. खोलीचें दार लावून तो चाळीबाहेर पडला.

चाळीच्या दरवाजाशीं भय्यानें हटकून त्याला म्हटले ' खड्डू, उद्याचा वायदा ध्यानात आहे ना ! '

' त्याच तरतुदींत आहे ' एवढेंच खड्डूनें जाता जाता तुटक उत्तर दिले.

खड्डू झपझप चालत एका मोठ्या घड्याळाच्या दुकानात शिरला.

आतील नोकरास त्यानें मालकाची गाठ घालून देण्यास सांगितलें. मालक आले. त्यानीं घड्याळाची किंमत दोनशें रुपये केली. खड्डूला अपरिमित आनद वाटला. पण मालकानीं घड्याळाची तबकडी उकलून जेव्हां आतील ' झुबरशेट ' हे नाव वाचले तेव्हा त्याचा चेहरा सशयानें व्याप्त दिसला. त्याच्या डोक्यात एक कल्पना आली व तिच्या अनुरोधानें त्यानीं प्रश्न सुरू केलें.

' तुझे नाव काय ?

' खड्डू '

' तू काय करतोस ? ' दुसरा प्रश्न.

' चौपाटीवर भेळ विकतो '

' असें होय ' मालकानीं गड्याला टेबलावरची वर्तमानपत्राची फाईल आणण्यास सांगितली. त्यातील झुबरशेठची घड्याळाबद्दल पचवीस रुपये बक्षीस मिळण्याबद्दलची जाहिरात मालक वाचीत होते व त्यांत दिलेल्या खाणाखुणा पडताळून ते पाहू लागले.

नतर मालक टेलिफोनवर गेले, झुबर शेठना त्यांनीं बोलावणें केलें; व घड्याळ सांपडल्याबद्दलची हकीगतही इग्रजीमध्यें सांगितली.

खड्डू ताटकळत उभा होता. एकदा मालकाना त्यानें पैसे देण्याबद्दल सुचविलेही, पण मालकानीं त्यास जरा वेळ थावण्याबद्दल सांगितले.

छुब्बरशेठ मोटारींतून आले. त्यानीं आपले घड्याळ ओळखले व खड्डूला खूप दम भरला.

× × ×

आणखी तासभरानें खड्डू गिरफदार झाला. दोन तीन दिवस खटला चालून खड्डूला तीन महिने सक्तमजुरीची शिक्षा झाली.

वर्तमानपत्राना खाद्य मिळाले. घड्याळाच्या चोरीची बातमी चटकदार पद्धतीनें छापली गेली. आवडीनें घरोघरी ती वाचली गेली.

राजारामपतानीही ती वाचली व ते बायकोला म्हणाले, 'याच खड्डूपासून आम्ही रोज भेळ घेत होतो चौपाटीवर. इतका हलकट असेल अशी माझी कल्पना नव्हती. बरें झाले दुसऱ्याचेच घड्याळ होते तें ! ! आपल्या जवळचे काहीं चोरले नाहीं त्याने ! बाकी घड्याळाची एकदरींत मौजच झाली ह ! माझ्याजवळ होते तोपर्यंत महिनाभर तुला सुद्धा तें कोठून आले याबद्दल थाग पत्ता नव्हता. पण खड्डूजवळ गेल्यावर चार तासात घड्याळ आपल्या मालकाकडे रवाना झाले व खड्डू तुरुगाच्या कोठडींत गेला. आहे कीं नाहीं मजा !! " राजारामपत अगदीं मनापासून हसत होते.

* * *

खड्डू तीन महिन्याची शिक्षा भोगून आला. आपल्या खोलींतील सामानाची भय्याने व वाण्याने केव्हाच विल्हेवाट लावली असेल याची त्यास जाणीव होती. खड्डू भिकारी झाला होता.

काहीं तरी उद्योग करून तोंडात दोन घास घालणें त्याला आवश्यक होतें. अजूनही आपला भेळेचा धदा चालेल असे त्याला वाटले. राजारामपंतासमोर जाण्यास त्याला सकोच वाटत नव्हता. त्याचें तें घड्याळ नाहीं अशी त्याची खात्री होती. त्याचा आपला लोभ तुटू नये म्हणून त्यानें राजारामपतांच्या नावाचा कोर्टांत उच्चारही केला नाहीं आणि आता त्याजपासून धंदा चालविण्यास रुपया उसना मागण्याचा त्यानें विचार केला. चौपाटीवर तो किती वेळ तरी त्याची वाट पहात होता.

अखेरीस राजारामपंत मित्रमंडळींच्या घोळक्यात आले.

'साहेब' खड्डू राजारामपंताजवळ उभा राहून अदबीनें म्हणाला, "रुपयाभर उसना देता? मला भेळ विकत घेण्याला पैसे नाहींत. चार एक दिवसात तुमची फेड करीन!'

ही विनंति खडूला तीन वेळ करावी लागली तेव्हा कुठे राजारामपंतांचें त्याच्याकडे लक्ष गेलें. शेवटीं त्याच्यापैकीं एका मित्राने 'हा पहा घड्याळ चोर!' असें म्हटले.

'कशाला' तिरस्काराने खडूकडे पहात राजारामपंत म्हणाले, 'म्हणे भेळ विकणार! चोऱ्या करून पैसे मिळव कीं. तो तर फार किफायतशीर धंदा आहे तुला!'

'साहेब...'

'चल चालता हो इथून. झुंबरशेठच्या घड्याळाची चोरी करून स्वतःच्या आयुष्यास लांछन लावून घेतलेस. ते आम्हाला माहीत नाहीं असें समजतोस तू ..रस्ता पकड...'

'झुंबरशेठच्या घड्याळाचा चोर कोण?" खड्डू आता जागृत झाला; राजारामपंताच्या एक एक मर्मभेदक शब्दानें त्याच्या अंतःकरणाची आग सारखी वाढत होती. '—मी चोर तसे तुम्हीही चोर, मी तें घड्याळ तुमच्या-पासून चोरलें, तुम्ही ते झुंबरशेठपासून चोरलेंत. मलाच तेवढा तुम्ही हलकट ठरवू नका. तुमची माझी पायरी एकच...'

'खंड्या—' राजारामपंत ताडकन उठून ओरडले 'एक शब्द जास्त उच्चारशील तर जिता कलम करीन. माझी बेअब्रु केल्याबद्दल फिर्याद ठोकीन, हे साक्षीदार आहेतच. तुला तुरुंगात पाठवीन, देशोधडीला लावीन' असें म्हणून त्यानी खडूला जोरानें बुटाची लाथ मारली.

खडू कोलमडून पडला. तो मुकाट्यानें उठला. त्यानें उलट शब्द केला नाहीं. राजारामपंत व त्याचे मित्रगण त्याच्याकडे पाहून फिदी फिदी हसत होते. जाताना खड्डू राजारामपंतास उद्देशून एवढेंच बोलला 'तुम्ही श्रीमंत बोलाल तो प्रत्येक शब्द खरा होऊ शकेल. कारण तुम्ही द्रव्यवान् आहात. पण माझ्या आयुष्याला कायमचे लांछन लागलें आहे.

तें आता नाहींसे होणार नाहीं. तुमच्यासारख्या धनिकाशीं झुजण्यानें ते नष्ट होण्याची आशाच नाहीं. कारण आम्ही गरीब. आम्हा गरिबाना या जगात लाछन पुसून टाकण्याचा एकच उपाय......मृत्यु—'

० ० ०

खड्डू दुसऱ्याच मिनिटाला चौपाटीच्या गर्दीतून दिसेनासा झाला.

## दोन बिलंदर : : : २०

दोन बिलदर होते. एक होता जुन्नरचा व दुसरा होता मावळचा. त्याची प्रथम ओळख नव्हती. दोघानींहि पाहिलें कीं बुवाबाजी, भविष्यें, चमत्कार यानी जिकडे तिकडे फसवणूक चालली आहे; आपणही अशाच एकाद्या तऱ्हेचा आश्रय करून जगास ठकवावे व पैसा कमवावा असे उभयतानीं योजले.

मावळच्या माणसानें तुपाची कासडी घेतली, त्यांत खाली पाणी ओतून वर थोडें पातळ तूप घातलें, कासडी भरगच्च आवळली व तूप विकण्यास तो मावळाबाहेर पडला.

जुन्नराकडे राहणाऱ्या मनुष्याने आपल्या गांवच्या नदींत मेलेल्या म्हशीचीं दोन शिंगे अशा रीतीनें खुपसली कीं एकाद्यास वाटावे म्हैसच पाण्यात बसली आहे. अशा तयारीनें तो नदीकाठी वाळवटात बसला.

काहीं वेळानें मावळचा मनुष्य फिरत फिरत तिथें आला व त्याने जुन्नरकडच्या इसमास विचारले ‘ तुम्हास तूप हवें का ? ’

त्यास होकारार्थी उत्तर मिळाले.

' पण पहा बुवा ! तूप उची आहे, कासडीला निदान पचवीस तीस रुपये तरी पडतील '

दुसऱ्याने विचार केला बघा कशाला ! उत्तमच असेल. त्याऐवजीं ही म्हैस याच्या गळयात मारावी म्हणजे झाले. तो म्हणाला ' माझ्यापाशी पैसे नाहींत, पण मला तूप तर हवे आहे. मग असे कर, ती पाण्यात म्हैस बसली आहेना, ती बदली घे ती चागली पन्नास साठ रुपये किमतीची आहे. '

सौदा पटला पण म्हैसवाल्याने एक अट घातली. तो म्हणाला ' म्हैस पाण्यात आहे ती मी नाहीसा होईपर्यंत तशीच राहू दे. कारण मी दृष्टीला पडल्यास ती तुझ्याबरोबर येणार नाही. आणि सभाळून ऐस. ती मारकुटी आहे–' असें म्हणून तो तुपाची कासडी घेऊन निघाला.

तो निघून गेल्यावर तुपवाल्याने म्हैस वर यावी यासाठीं पुष्कळ दगड मारले पण ती तोंड वर करीना शेवटी तो म्हशीजवळ गेला पाहतो तो काय ? गाळात शेजारी नुसती शिगे रुतविली होती ! त्याला राग आला. तो जुन्नरवाला तूप घेऊन गेला त्या वाटेकडे धावला.

इकडे जुन्नरवाल्याने बरेच लाब गेल्यावर कासडी उघडून पाहिली पण फक्त पाणीच आढळले. तो मावळल्यावर खूप रागावला. इतक्यात मावळ-वाला समक्षच येऊन पोहोचला.

दोघाचीहि एकमेक बिलदर आहोत ही खात्री झाली. व त्यानी दोघानी जगास फसवावयाचें असें ठरविले.

ते हिंडता हिंडता एका गावीं एका म्हाताऱ्या बाईकडे उतरले. बाई श्रीमत होती. तिचें मोठें घर होते. पडवीत निजल्या निजल्या त्यानीं दुसऱ्या दिवशीं बाईस फसविण्याचा निश्चय केला. तो बाईने ऐकला. ती त्याच्याहि-पेक्षा वस्ताद होती.

दुसऱ्या दिवशी सकाळीं तिनेंच त्या दोघांना ' कामावर राहता का ? ' म्हणून विचारले. त्याना वाटले आयतेच आपले साधले ! त्यानीं ते कबूल केले.

त्या बाईनें जुन्नरवाल्याला आपली म्हैस सभाळण्यास सांगितले. व मावळवाल्यास कावडीनें राजण भरेपर्यंत पाणी वाहण्यास सांगितले. काम नीट केले तर शिदोरी द्यावी अशी बोली होती.

जुन्नरवाल्याची हाडें म्हशीनें नरम केली. ती म्हैस मोठी अवखळ होती. एका जागेवर कधींच स्थिरावली नाहीं. त्याला तर म्हशीमागे जाणें आवश्यक होतें.

मावळवाल्याचा राजण तीन कावडीचाच होता. पण कावडीला होतें भोक ! काही केल्या राजण भरेना ! !

दोघासहि जेवण मिळाले नाहीं.

रात्री दोघानीहि ठरवले कीं आपण आपल्या कामाची स्तुती करावी व आपले काम दुसऱ्याला देऊन त्याचे लाटावे म्हणजे जेवण तरी भेटेल.

जुन्नरवाला मावळवाल्यास म्हणतो '—माझा उद्योग फार सुखकर बुवा. म्हैस नदीवर पाणी पिते व लवणात गवत खाते असे तें काम. उद्या तर मी बाज घेऊन जाणार वाळवटात बसायला.'

मावळवाला म्हणतो ' माझे काम तर फार सोपे ! एकदा तीन कावडींनी राजण भरला कीं जेवण आणि स्वस्थ झोंप !'

दोघानीहि आपलीं कामे एकमेकात बदलली. त्यातल्यात्यात मावळवाला डोक्यावर बाज घेऊन गेला होता. त्यास तर म्हशीमागे हिडता हिडता बाजही जवळ बाळगावी लागली. त्या दिवशी रात्रीं दोघानीहि एकमेकाची हजिरी घेतली त्याची खात्री झाली कीं बाई बिलदर आहे. त्यानी तिला फसवून तिजजवळचे द्रव्य लुबाडण्याचा निश्चय केला.

बाईने ते ऐकले होते.

ती म्हातारी बाई पहाटेच्या वेळींच उठली. आपल्या ट्रंकेतील दागदागीने तिने घराखालीं बळद होते त्यामध्ये, एका गाठोड्यात बाधून ठेवून दिले, दागिन्याच्या ट्रंकेत दगड भरले, तिला कुलूप लावले व म्हातारी निजली.

सकाळी या दोघाच्या नतरच ती थोडीशी उठली.

उठल्यावर त्या दोघास म्हणाली ' अलीकडे गावात चोर फार झालें आहेत असे ऐकते, माझेपाशीं थोडे दाग दागिने, पैसाअडका आहे. मला

भिती वाटते. तेव्हा तुम्ही मी सागते असे करा. मागील परसात विहीर आहे. तिच्या कपारींत मी माझ्या जवळच्या सर्व सोन्या-नाण्यांनीं भरलेली ट्रक तुम्हास देते तेवढी ठेवा. '

आणि नतर तिने समक्ष दोघाकडून ती ट्रक कपारींत ठेवविली.

त्याच दिवशीं रात्रीं दोघेही कामावरून एके ठिकाणी आल्यावर दोघाचे हितगुज झाले. विहीरीत उतरण्यासाठीं दोघानी एक दोरही पैदा करून ठेवला.

रात्रीं बारा वाजले. म्हातारीचे घोरणे स्पष्ट ऐकू येत होते. दोघे मुकाट्यानें तो दोर घेऊन मागील विहीरीजवळ गेले.

विहीर खोल होती. त्यातून रात्रीची वेळ. दोघापैकीं प्रत्येकाला वाटे आपण ती ट्रक वर आणावी. हो ना करता करता मावळचा मनुष्य दोराच्या साहाय्याने खालीं उतरला.

त्यानें ती ट्रक काढली. पण त्याच्या मनात ट्रकेत कितीपर्यंत दाग दागिना आहे, किती पैसे आहेत, हे पहाण्याची इच्छा बलवत्तर झाली. म्हणून त्याने ती ट्रक तिथेच उघडली.

पण आत पहातो तो दगड धोंडे !

वरचा मनुष्य सारखा ट्रक दोरास बाधण्याबद्दल त्यास हळु आवाजात सागतच होता.

पण मावळवाल्यास वाटलें आपण ट्रक दिली तर हा ती आधीं डोक्यावर घेऊन पळून जाईल ! मग आपल्याला कोण काढणार ?

त्याला एक युक्ति सुचली. त्याने ट्रकेतील दगड हलकेहलके विहिरींत टाकून ती रिकामीं केली, ती दोराला बाधली, आपण तीमध्ये बसून ती लावून घेतली व खुणेकरिता म्हणून दोर हलवला.

जुन्नरवाल्यानें ट्रक भरभर ओढली. आपल्या मित्राला काढल्यास त्यास ट्रकेंतील अर्धं द्रव्य द्यावें लागेल म्हणून त्यानें पुन्हा दोर खालीं सोडला नाहीं. अधारांत विहिरीतील काहीं दिसत नव्हतेंच. त्यानें ट्रक डोक्यावर घेतली, जड असल्यामुळें आपणांस पुष्कळ द्रव्य लाभेल या विचारानें समाधानाचा निश्वास सोडला आणि गावांबाहेर पळण्यास सुरवात केली.

तो ट्रंक डोक्यावर घेऊन पळत पळत गावापासून दोन कोसावर आला. त्यावेळीं जिकडे तिकडे पहाटेचा सुमार होता. आजूबाजूस मनुष्यवस्ती नव्हती व अजून अंधारहि सरला नव्हता.

त्याने डोक्यावरील ट्रंक खालीं उतरली अन् उघडली. तों काय! द्रव्या-च्या ऐवजी ट्रंकेंतील मावळा त्यापुढें दत्त म्हणून उभा ! !

जुन्नरवाल्याचा संताप झाला, त्यास मावळकरास मारावें असेंहि वाटले परंतु तसें करणें शक्यच नव्हतें. पळण्याच्या श्रमानें अगोदरच तो थकून गेला होता. तो कपाळावर हात ठेवून मटकन खालींच बसला.

मावळवाला उपहासपूर्ण हसून म्हणाला, 'बरें झालें. मला एकट्याला विहिरींत मारण्याचा विचार होता नाहीं का?'

बरीच प्रश्नोत्तरें झालीं. अखेरीस दोघांहि बिलंदरांचें ऐक्य झालें. दोघा-नीहि पुन्हां एकमेकाशीं दगलबाज न होता पैसा मिळविण्याच्या मोहिमेवर जाण्याचें ठरविले.

जवळच एक गाव होते. त्या गावात ते आले. त्या दिवशीं एका शेतावर मोलमजुरी करून त्यानीं पोट भरलें. त्याच वेळीं इतर कामकऱ्याकडून त्याना गावातील एक महत्वाची बातमी लागली.

गावातील एक धनवान् सावकार नुकताच मरून आजचा तेरावा दिवस होता. त्याला एक बावीस तेवीस वर्षांचा मुलगा असून तो फार दयाळू आहे असेही त्यानीं ऐकले. ह्या सावकारानें बालपण अत्यंत दरिद्री अवस्थेंत काढून आपल्या कर्तबगारीवरच त्याने संपत्ति व सावकारी वाढविली होती.

या दोघा बिलंदरानी संध्याकाळीं कामकाज संपल्यावर एका झाडाखालीं बसून दुकानांतून आणलेली मेवामिठाई खाता खाता एक बेत केला.

स्मशानात एक खड्डा खणण्यात आला. त्यात जुन्नरवाला बसला. त्यावर बारक्या सारक्या काटक्या घातल्या गेल्या आणि नंतर वाळू पसरण्यात आली. जुन्नरवाल्यास श्वासोच्छ्वास करण्याकरिता एक दोन भोके राख-ण्यात आलीं. संध्याकाळीं काळोख पडू लागल्यामुळे वाळवटांत या ठिकाणीं खड्डा असेल असें भासत नव्हते.

मावळा त्या सावकाराच्या मुलाचा शोध करीत गेला व तो भेटल्यावर त्याला म्हणाला 'दादा, तुमच्या सावकारांनीं लहानपणीं आमच्या आई-

पासून शेतें, मळे घेण्यासाठीं पांचशे रुपये घेतले होते. त्याचें आता व्याज मुद्दलासुद्धा तीन हजार झाले. सावकार होते तोंपर्यत आमचा त्याच्यावर विश्वास होता म्हणून आम्ही शब्द टाकला नाहीं, पण आता धीर धरवत नाहीं !'

'पण कशावरून तू हें म्हणतोस; काहीं पुरावा...'

'महाराज आपण खेडयाची देवभोळी माणसें. शब्द म्हणजे आपणास रामाचा बाण. त्यातून माझी अशी श्रद्धा आहे कीं, सावकारानीं स्मशानात जिथें देह ठेवला तिथूनही ते ही गोष्ट कबूल करतील. हो, खरे असेल तर तसे होईल. या कलियुगातही चमत्कार होतातच ! अजून काहीं देवानें डोळे झाकले नाहींत'

सावकाराच्या मुलास हे उद्गार पटले. दोघेही स्मशानात गेले. मावळयानें स्मशानात सावकारास उद्देशून 'तुम्हास काहीं कर्जपाणी होते का?' असा मोठयाने प्रश्न विचारला.

'एका म्हातारीचे मुद्दल व्याजासुद्धा तीन हजार रुपये देणे आहे' असे उत्तर आले.

सावकार–पुत्रास आश्चर्य वाटले. ज्याअर्थीं इतकी प्रचीति आली त्याअर्थीं हा सागतो ही गोष्ट खरी असली पाहिजे अशी त्याची खात्री झाली व वाडयात जाऊन तिजोरीतून मावळयास तीन हजार रुपये काढून देण्यात आले.

मावळयाने कमरेचा कसा खोलून त्यात नोटा भरल्या, बदोबस्ताने कमरेस लावल्या आणि स्मशानात असलेल्या व पैसे मिळविण्याच्या कामी उपयोगी पडणाऱ्या जुन्नरवाल्याचीं यत्किचितही फिकीर न करता तो त्याच्यापासून शक्य तितकें दूर जाण्यासाठीं गावाबाहेर पडून पळू लागला.

इकडे जुन्नरवाल्याने चागला अधार पडेपर्यंत वाट पाहिली. मावळवाला येण्याचे चिन्ह दिसेना तेव्हा तो वरती आला. सावकार पुत्राजवळ आपला संशय प्रगट न करता मावळवाल्यास आपला मित्र सबोधून तो कोणत्या वाटेनें गेला म्हणून जुन्नरकरानें चौकशी केली.

सावकाराच्या मुलानें त्यास तीन हजार रुपये घेऊन गेल्याचें सांगून मावळा ज्या वाटेनें गेला, ती वाटही दाखविली. जुन्नरवाला त्या वाटेने झपाटयानें निघाला.

रात्रीं दहा वाजण्याची वेळ. मावळ्यानें आपल्यामागे कोणी आहे असें पाहिले व थोडयाच वेळात तो जुन्नरवाला आहे अशी त्याची खात्री झाली. कारण रस्त्याची कितीही वळणें घेतलीं तरीं तो मनुष्य त्याची पाठ सोडीना.

मावळवाला एका गावाच्या टप्यांत येऊन पोहोचला. जुन्नरवाला त्याच्या पाठीशीं होताच.

तो ज्या गावांजवळ आला त्या गावात प्लेगची साथ होती. माणसे पटापट मरत होती. सगळया माणसाना अग्नि देणे अशक्य होते. म्हणून पन्नास एक प्रेते गावाबाहेरच टाकण्यात आलीं होतीं. तीं मावळवाल्याचे नजरेस आली.

त्याच्या डोक्यात तत्क्षणी एक कल्पना उगवली. त्याने कमरेचा पैशाचा कसा दूर एका मातीच्या ढिगाकडे शिताफीने भिरकावला आणि त्या प्रेतात तो निजून राहिला. जुन्नरवाल्यास अशा रीतीने बगल देण्याचा त्याचा विचार होता.

जुन्नरवाल्याची खात्री होती मावळा इथेच कुठे तरी आहे; परतु हुडकावा कसा ? त्याच्याजवळ द्रव्य असेल पण प्रत्येक प्रेताची नीट तपासणी करण्यास खूप वेळ लागणार व तेवढयात आपणास कोणी धरले तर आपणास होणारा लाभही जाणार.

शेवटी त्याने एक हिकमत काढली.

खिशातील तपकिरीची डबी काढून तपकीर चिमटीत घेऊन प्रत्येक प्रेताच्या नाकाला ती लावीत जुन्नरवाला चालला.

मावळवाल्यास शिंक आवरणे अशक्य झाले. त्यास एक सोडून पाच दहा शिका आल्या.

दोघानीही जाणले कीं ही बाचाबाचीची वेळ नव्हे. कोणाच्या नजरेस आले तर सर्वच घबाड जाईल हे त्यास ठाऊक होते.

मावळ्याने मातीच्या ढिगाजवळ पडलेला आपला कमरेचा कसा आणला.

दोघाहि बिलदरानीं दीड–दीड हजार रुपये वाटून घेतले व आपआपल्या घराची वाट पकडली.

---

**टीप**–अशा धर्तीच्या गोष्टी खेडोपाड्यातून करमणुकीखातर नेहमीं सागण्यात येतात.

## रानपांखरांचे प्रेम : : : २१

आनदपुरातील नागेश्वराचा उत्सव म्हणजे मोठा गडबडीचा दिवस असे. बारा कोसावरची बारा गावे तेवढ्या एका दिवसाकरिता हटकून जमायची.

माझा मित्र जनुभाऊ हा आनदपुरचा राहणारा. दर वर्षी तो मला नागेश्वराच्या यात्रेला येण्याबद्दल आग्रह करीत असे. यदा शक्य तितके आढेवेढे घेऊन देखील जनुभाऊ ऐकेना तेव्हा माझा नाइलाज झाला.

यथासाग उत्सव आरास पार पडून जनुभाऊच्या ओटीवर मडळीं गप्पा मारीत बसली होती. मीही त्याच्यात सामील होतो. सध्या गावातील चर्चेचा विषय म्हणजे आदल्याच दिवशीं एका तरुण बाईनें नवऱ्याच्या जाचाला कटाळून जीव दिला त्यासबधी होता.

‘ या खेडयांतून तरुण बायका नवऱ्याच्या जाचामुळें आत्महत्या करतात आणि शहरात तरुण पुरुष कामधदा नसल्याकारणानें स्वत:चा अत ओढवून घेतात ’ मी म्हणालों.

‘ कधीं कधीं निराळ्या कारणाकरिता नवरा व बायको दोघेही एकदम जीव देतात ’ शेजारचा एक इसम म्हणाला.

‘ जरा स्पष्ट बोला चिमण पाटील.. . ’

जनुभाऊला मध्येच थाबवून मी म्हटले, ‘ आहेत, अशी एकदोन उदाहरणे घडलेली माझ्या ऐकण्यात आहेत. प्रेमाकरिता मरणाला कवटाळले होते दोघानी. पण असल्या गोष्टी शहरात खेड्यापाड्यातून.. ...’

‘ आमच्या वाडीतच घडलेली आहे अशी हकीगत चार पाच वर्षांपूर्वी’ चिमण पाटील बोलला.

‘ माझी अशी ठाम कल्पना आहे कीं खेड्यात असले उदात्त प्रेमाचे दाखले मिळणे शक्य नाही ’ मी चिमण पाटलाला म्हणालो ‘ अहो, शहरात कथावाङ्मय वाचून वाचून असले रोमान्स लोकाच्या रोमरोमात आढळून येतात पण तुम्ही सागता ही बातमी खरीच असली तर हे प्रेम फ्रेमच करून ठेवण्याच्या लायकीचे आहे ’ मी हसतच पुस्ती जोडली.

‘ चावटपणा काय लावला आहे ’ जनुभाऊ माझ्यावर थोडा सतापला होता ‘ तुम्हा शहरच्या लोकाचे हसल्याखेरीज भागायचे नाहीं. कितीहि गभीर विषय असू द्या, तिथे विनोद सापडून खिदळायचेच तुम्ही. मला वाटतें, शहरोशहरीं आता हर्षवायु नांवाचा रोग फैलावणार ! ’

नतर चिमण पाटलाकडे वळून जनुभाऊनें विचारले ‘ पाटील, काय झाले हो ? ’

‘ कळू द्या तरी एकदां सर्व काहीं ’ आणखी कोणी पृच्छा केली.

मलाहि चिमण पाटील काय सागतो ते ऐकण्याची उत्सुकता उत्पन्न झाली होती.

‘ आमच्या गावात पूर्वी म्हादबा म्हणून शेतकरी रहात होता ’ चिमण पाटलानें सुरवात केली ‘ त्याला दोन मुलगे होते. थोरला गुणाजी व धाकटा संभू. गुणाजीचे लहानपणापासून सभूशी कधींच पटले नाहीं. सभू स्वभावानें गरीब होता. म्हादबा वारल्यावर त्याच्या शेतीमध्यें वाटण्या करावयाच्या ठरल्या. शेती खूप होती त्याची. गुणाजीच्या कोणतीच वाटणी मनास येईना. सभूनें विचार केला, उगीच भाडून कोर्टाची धन करायची त्यापेक्षां

सगळे आपल्या भावालाच द्यावे. त्याने तसे तसे केले व सभू आपली बायको आणि एक तान्ही पोर यासह मुबईला उद्योग धदा बघण्यास आला.

पुढे त्याला नोकरीहि लागली गिरणीमध्ये. सभू आपला होते त्यात सुखा-समाधानाने रहात होता. तथापि देवाला हे पाहवलें नाहीं. दोनतीन वर्षानीं प्लेगची आपत्ति अचानक आली. सभू व त्याची बायको दोघेहि काळानें हिरावून नेली.

गजरा त्यावेळी चार वर्षांची असेल फार तर. आपण कोणत्या परीस्थि-तींत आहोत याची जाणीव तिला येणे शक्य नव्हते. आपल्याशीं जिव्हा-ळ्यानें वागणारी माणसे आता दिसत नाहीत एवढेंच ती समजत होती.

सभू ज्या चाळीतल्या खोलीत रहात होता त्याच्या शेजारील मनुष्य दयाळू होता त्याने गजरेला दोनतीन महिने सभाळली. तेवढ्या अवधींत त्यानें त्या लहान छोकरीच्या नातलगाचा शोध चालवला व गजराला गुणाजीच्या घरी आणून पोंचवली.

गुणाजीनें गजराला कधी बोलून दुखावले नाहीं किंवा तिचा त्यानें केव्हा अव्हेर केला नाहीं. परतु हे सर्व ती आपली पुतणी म्हणून नव्हे अगर गजरा पोरकी पोर होती ह्याहिकरता नव्हे. याच्या बुडाशी निराळाच हेतु होता.

एक तर आम्हां मराठ्याच्या माणासाला जमीन पुष्कळशी असली की कीं शेतीच्या धद्यासाठीं मनुष्य बळाची गरज असते. गडी ठेवले तर रोज उचलून पैका मोजावा लागतो. शेतकऱ्याला खायला भरपूर असते पण पैशाचे दुर्भिक्ष त्याजपाशी नित्य. यासाठीं घरात तुकडा खाऊन कष्ट करणारे आसामी जेवढें असतील तेवढें हवेच असतात.

या खेरीज गुणाजीचा दुसराहि स्वार्थ होता. गजरा नाकाडोळ्यानी नीटस होती. आमच्यात पोरींचे पैसे घेतात लग्नाबद्दल.

आणि म्हणूनच गजरा त्यास जड वाटली नाहीं.

गजरा आपली सहा वर्षांपासून शेतीचे काबाडकष्ट उपशी. लहानपणी मेहनतीचे काम ते कोणते होणार ? पण तिला झेपेल तितके ती करीत असे.

गुणाजीच्या शेतावर बजाबा नांवाचा पोऱ्या कामाला होता. थोडा लहान असेल गजरेहून. पोर मोठें चुणचुणीत होते.

लहानपणापासून गुरामागें, पेरूच्या बागेंत, केळीच्या बागाना पाणी देण्याच्या धारेवर वगैरे ठिकाणी कामे तो करीत असे. त्याला आईबाप कोणी नव्हते. एक मावशी होती तिजजवळ बजाबा असे.

गजरा बहुतेक शेतकाम बजाबापाशींच शिकली. लहानपणापासून दोघेहि हंसत खेळत कष्ट करीत असत.

पुढें गजरा वयात आली. तिला सर्व कळू लागले. आपण राबतो यातील निम्मे शेत आपले आहे हेहि तिला समजले. तथापि ती गुणाजीजवळ कधीच काहीं बोलली नाहीं.

गजरा सकाळीं भाकरी बाधून जी मळयात जाई ती सध्याकाळच्या धारा झाल्या कीं दूध घेऊन घराकडे परते.

गजराच्या मनांत अलीकडे बजबाविषयीं विचार येऊ लागले होते. इतक्या दिवस ती एकमेक खेळीमेळीने वागली तेव्हा तिला सहाजीकच बजाबासबधीं आपलेपणा वाटू लागला होता.

आणि एकदा गजराच्या बजाबाबद्दलच्या विचाराना जोराची चालना मिळाली.

त्या दिवशीं सायकाळींच बजाबा पेरूच्या मळयावर राखण करीत होता. सूर्य मावळून बराच अवधीं झाला असून सधिकालचा प्रकाशहि हलके-हलके ओसरत होता.

गजरा दुधाची चरवी डोक्यावर घेऊन चालली होती. चरवी तीं अधा-तरींच ठेवी. रोजच्या सवयीनें तिला चरवीस हाताचा आधार देण्याची जरूर भासत नसे.

पेरूचा बाग ज्या शेतात होता त्या जवळूनच वाट होती घराकडे जायची.

रोजच्या सारखी गजरा वाट चालत होती तोंच—

एक दगड वेगाने आला. तिच्या दुधाच्या कासडीवर आदळला. अधा-तरी असलेली चरवी कलडली व गजराच्या पाया पासल्या जागेवर दुधाचा सडा झालेला तिनें देखला.

‘ कोणी मारला दगड ? ’ ती मोठ्यांदिशी ओरडली. लगेच तिला रडूं कोसळले.

गजराला वाटले गुणाजी काय म्हणेल. एवढ्या दिवसांत केव्हां तिच्या हातून असे झाले नव्हते.

फार वेळ लोटला नाहीं तोंच बजाबा आला.

‘ कोण गजरा ! ! ’ त्यानें आश्चर्यानें म्हटले ‘ माझा समज झाला दुसरे कोणी असेल. कुठे लागला दगड ? जवळच पोपटाचा थवा पेरूच्या झाडावर दिसला, म्हणून केली गोफणफेक ’

गजरा हुदके देतच होती.

मग बजाबा तिच्या समीप जाऊन म्हणाला ‘ कुठे लागले, साग ना गजरा ? ’

‘ मला जखम झाली असती तरी बरे होते पण दुधाची चरवी पालथी झाली कीं ’

‘ तू नाही ना कुठे दुखावलीस ? ’ गजरेचे डोळे स्वत:च्या खमीसाने पुशीत बजाबा उद्गारला

मग तिचा चेहरा आपल्यासमोर धरून तो म्हणाला ‘ रडू नकोस ह ! बघ माझ्याकडे. हास पाहू ! ’

गजरानें त्याच्या नजरेला नजर मिळवली. अगदी सहजगत्या तिच्या तोंडावर स्मिताची लकेर चमकली.

‘ मी किती घाबरलो होतो तुला बघितल्यावर ! माझा प्रेमाचा ठेवा कष्टी झालेला पाहून कसे चैन पडेल मला. गजरा...’ बजाबाने तिचे झट्-कन चुबन घेतले.

‘ बजाबा, जाते मी आता. गुणाजी म्हणेल, ही अजून कशी आली नाहीं ? ’ गजरा जाण्याच्या सिद्धतेने बोलली—

‘ थाब जरा इथेच. मी दूध घेऊन आलोच इतक्यांत ’ असे म्हणून बजाबाने चरवी उचलली व तो गेलाच.

अन् थोड्याच अवकाशात त्यानें चरवी दुग्धानें काठोकांठ भरून आणली.

‘ कोठून घेऊन आलास एवढे दूध ! ’ गजरानें विचारले.

' विकत. पैसे खुळखुळल्यावर काय तोटा आला आहे दुधाला. करत काय ! तू सागशील गुणाजींना माझा पराक्रम आणि...'

' मी अवाक्षर देखील उच्चारणार नव्हते याबद्दल. बरे जाते. आज रोजच्या मानाने उशीर झाला बराच '

गजरा घराकडे वळली.

बजाबाहि आपली राखणदारी करायला गेला.

ह्या गोष्टीला दोन महिने उलटले. गुणाजीच्या घरात गजराच्या लग्नाच्या वाटाघाटी सुरू झाल्या. दोन तीन जण नवरीला पाहून गेले. हुडा पण पटला. बजाबाच्या आग्रहावरून त्याच्या मावशीने गुणाजीपाशीं गजरेकरतां मागणी घातली. परतु बजाबाचे हातावर पोट, पाचशे रुपये हुडयाची रक्कम त्यास कशी झेपणार ?

पुढें गजरेचा विवाह ठरला.

आणि हे कळल्या दिवसापासून बजाबाने गुणाजीकडील चाकरी सोडली.

—गजरेचा जीव अलीकडे कावरा बावरा बनला होता.

एकदा ती आपल्याशीच गुणाजीला लग्न मोडायला सागण्याचा निश्चय करी. तिला वाटे कीं बजाबाला शोधून काढून त्याजबरोबर कोठेतरी निघून जावे.

पण हे विचार क्षणिकच ठरत. जराशानें तिच्या मनात येई '-बजाबाचा आज पधरवडाभर पत्ता नाहीं. आपण त्याच्यासाठीं म्हणून या घराची सावली सोडली आणि बजाबा भेटलाच नाहीं तर...बजाबा कुठेहि असला तरी त्याला धास्ती नाहीं...तो पुरुष आहे....आपण स्त्री आहोत...'

दुपारचा सुमार होता. गजरेच्या लग्नाला अवघे चारच दिवस राहिले होते. गजरा शेतावरच्या एका झाडाखाली सचिंत मुद्रेनें बसली होती.

इतक्यात मागून कोणीतरी येऊन तिचा हात पकडला.

तिनें चमकून मागे पाहिले. बजाबा दिसला तिला.

' गजरा, जातो मी; तुझा निरोप घ्यायला मुद्दाम आलो '

' कुठें जाणार ?'

बजाबा जवळच्या डोंगराकडे अगुलिनिर्देश करून म्हणाला ' तो बघ, समोर वणवा पेटला आहे ना...'

' खरेच कीं ! विचारांच्या भरांत माझे ध्यानच नाहीं गेले... '

' मीच चेतवला आहे तो जाळ! आणि विझवणार आहे. माझ्या अंतः-करणांतला वणवा...तुझी शेवटली भेट घेतल्यावाचून राहवेना. गावकऱ्याना वणवा दिसला आहे पण ते जमून आगीचा भडका नाहीसा करण्याला येण्यास तास तरी हवा...निघालो बरें का... '

गजरेचा हात सोडून तो निघून गेला.

काय वाटले गजरेला कोणास माहीत ? जरा वेळानें तीहि बजाबाच्या नावाचा घोष करीत त्याच्या मागोमाग गेली.

वणव्याचीं आग जेव्हा विझली तेव्हा गावकऱ्याना दोन जळून विद्रूप झालेल्या मनुष्याकृति एकमेकाशेजारी आढळल्या, पण त्यावेळीं कुणाचा कांहीं तर्क चालला नाहीं.

दुसरे दिवशी सबध गावात ज्याच्या त्याच्या तोंडी एकच वार्ता होती ' बजाबा व गजरा वणव्यात सापडून मेली '

इतके सागून चिमणपाटील गप्प बसला.

मग जनूभाऊ माझ्याकडे निरखीत म्हणाला ' शहर काय किंवा खेडें काय ? मानवी दृष्टया ईश्वरानें निर्माण केलेले मनोव्यापार इथून तिथून सारखेच. सुशिक्षितांनाच फक्त भावनाचे महत्त्व समजते व अशिक्षित खेड-वळांना ते कळत नाहीं असे मुळीच म्हणता यायचे नाहीं. '

' बरोबर आहे ' मी अभिप्राय दिला.

# एक स्वप्न : : : २२

ऐन पावसाळ्यातली ती रात्र—

सकाळपासून सध्याकाळपर्यंत श्रम करून थकल्यामुळें पथारीला पाठ टेकताक्षणीं मला झोपेनें घेरले व त्यामध्येच एक स्वप्न पडले.

स्वर्गांत सिंहासनावर देवाधिराज आरूढ झाले होते. त्यांनीं आज्ञा उच्चारली ' जा रे मेघाला बोलावून आणा '

जरा वेळाने एक मेघ हात जोडून त्याचेसमोर उभा राहिला.

देवाधिदेव म्हणाले ' पृथ्वीवर काय हालहवाल आहे ती बघून ये '

मेघ आनदला देवानीं त्यास कामगिरी सागितली म्हणून—

का नाहीं असे होणार ! त्याला देवाचा आदेश आज कित्येक युगे झाला नव्हता.

रामराज्यांत देवदेवेधरानीं त्याला अशीच अनुज्ञा केली व मेघानें ' अवनीतलावर सगळीकडे आबादी आबाद आहे, कोणी पापे करीत नाहीं, चुकून एक मनुष्यसुद्धा खोटें बोलत नाहीं, भाडणे नाहींत...' ह्या

प्रकारची बातमी आणली होती.

परमेश अर्थातच सतुष्टला व देवाला आपण समाधान दिले याचा मेघाला फार फार आल्हाद वाटला होता.

आता आपणास असेच सतोष देण्याचे काम आले म्हणून हर्षभरित होत्साता मेघ पृथ्वीलोकावर निघाला.

त्याचा रग पाढरा शुभ्र; त्याच्या निष्कलक, पापभीरु भावनानीं उत्फुल्ल अशा हृदयाची मूर्तिमत निशाणीच जणू—

मेघ नेहमी स्वर्गाजवळच असे. रामराज्यापासून त्यानें पृथ्वी पाहिली नव्हती.

खाली येत असता—मावळत चालला मेघाचा आनद ! पृथ्वीवरील असख्य पातके अवलोकून त्याचे अतरग द्रवून गेले; त्याची गति कुण्ठित होण्याची खेप आली. त्याची पाऊले जड पडू लागली.

देवाच्या विषादाला आपण कारणीभूत होणार ही कल्पनाच मेघाला सहन करवेना.

पुढें पुढे त्याचे पायच उचलेनात. त्याचा चेहरा व अग काळेठिक्कर बनले. त्याचा तजेला पार कुठे गेला.

अखेरीस मेघाला रडू कोसळले.

उच्चरवानें त्याचे शोकार्त अतःकरण आक्रदू लागले.

मी दचकलो आणि जागा झालो.

बाहेर अधार दाट दाट भरला होता व पाऊस जोरजोरानें पडत होता.